TUKARAM

संत-ग्रंथ-प्रदीपावली : १

# श्री तु का रा म - गा था
# श ब्दा र्थ सं द र्भ को श

पान ७० ग्रंथशब्द + 4299 क्रमांकाचा अभंग

संपादक

**डॉ० मुकुंद श्रीनिवास कानडे**

**श्री० रामचंद्र शंकर नगरकर** 020-24490077

एकनाथी भागवत, नामदेव गाथा, ज्ञानदेव गाथा, रामदास

लोककल्याण हो- सो. ,७७ शनिवार, पुणे

आह्मां घरीं धन शब्दांचींच रत्नें। शब्दांचींच शस्त्रें यत्नें करूं ।। १
शब्दचि आमुच्या जीवाचें जीवन। शब्द वांटूं धन जनलोकां ।। २
तुका म्हणे पाहा शब्दचि हा देव। शब्देंचि गौरव पूजा करूं ।। ३

—श्रीतुकाराम

शांताराम ...कर 23 सप्टें ०८

शरद साठे कडून भेट

**रामदासी प्रेरणा प्रसारक समुदाय** श्रीसमर्थ-विहार एरंडवन, पुणे ४

मूल्य २५० रुपये

आवृत्ती पहिली
रामनवमी, शके १९२१
(२५ मार्च १९९९)

संगणकीय अक्षरजुळणी
पूर्णाक्षरम्, पुणे ३०

मुद्रक
मा० वि० दात्ये
गणेश प्रिंटर्स
६९३, बुधवार पेठ, पुणे २

प्रकाशक
अनंत भालचंद्र चितळे
रामदासी प्रेरणा प्रसारक समुदाय
४०/१५ अ, एरंडवन, पुणे ४

वितरण-व्यवस्था
श्रीसमर्थ ग्रंथ भवन
५५०, नारायण पेठ
माती गणपती चौक, पुणे ३०

॥ श्रीविठ्ठल ॥

संतसाहित्याचे रसाळ भाष्यकार
ह० भ० प० ल० रा० पांगारकर
यांना सादर समर्पण

ज्यास साधतां येईल त्यासच त्या अभंगाचा विवक्षित अर्थ व प्रान्तहीन वर्म कळेल. वेदोपनिषदांतील प्रमेय, कर्म, उपासना, भक्ति आणि जीवब्रह्मैक्यज्ञान यांचा अविष्कार व त्यांची अभिव्यक्ति ही श्रीतुकाराम महाराजांच्या 'मुखावाटें अमृतवचनें होऊन आली' हा मराठी भाषेंतील एक अलौकिक ठेवा आहे. वेदान्त-सिद्धान्ताचें ज्ञान असलें तरीहि अभंगांमध्यें ते सिद्धान्त कसें सूत्रित केले आहेत, सिद्धान्तांची ओवण अभंगांमधून कशी आहे, हें संप्रदायपूर्वक अध्ययनाविना सहजीं कळेलच, असें नाहीं. अभंगाची भाषा ही सोपी असली तरीहि ते अभंग गव्हर-गुप्त व सखोल अर्थानें भरलेलें असल्यामुळें प्रातिभ-अनुभूतिसंपन्नता सांगणारे आहेत. त्याकरितां परंपराप्राप्त ज्ञानद्वारा–विचारसरणीद्वारा अभंगाचा गूढार्थ स्पष्ट होतो. अभंगाचा गूढार्थ, तात्पर्यार्थ, विवक्षितार्थ, किंवा प्रक्रियात्मक–प्रमेयात्मक अर्थ कळला नाहीं, तरी त्यांचा प्रथमोपस्थित, शक्तिवृत्तीनें होणारा अर्थ समजणें प्रथम गरजेचे आहे. पद-पदार्थ-संबंध ज्ञानास 'शक्तिग्रह' असें म्हणतात. या शक्तिग्रहास, किंवा शब्द-शब्दार्थ-संगति ग्रहास प्रधान आठ कारणें आहेत, तीं अशीं–

**शक्तिग्रहं व्याकरणोपमान, कोशाप्तवाक्यात् व्यवहारतश्च ।**
**वाक्यस्यशेषाद्विवृतेर्वदन्ति, सांनिध्यतः सिद्धपदस्य वृद्धाः ॥ १ ॥**

१ व्याकरण, २ उपमान, ३ कोश, ४ आप्तवाक्य, ५ वृद्ध व्यवहार, ६ वाक्यशेष, ७ विवरण आणि ८ सिद्ध पदांचे सांनिध्य, या आठ कारणद्वारा कोणत्याहि पदांचा-शब्दांचा संगतिग्रह किंवा शक्तिग्रह होतो. शब्द-शक्तिसच 'शब्द-वृत्ति' म्हणजे शब्दाचा आपल्या अर्थाशीं असलेला संबंध, असें म्हणतात. शब्दांत शक्तिवृत्ति, लक्षणावृत्ति, गौणीवृत्ति, व्यंजनावृत्ति अशा अनेक वृत्ति आहेत. त्या पदपदार्थाच्या शक्तिग्रहाच्या शब्द-शब्दार्थ संगतिग्रहाच्या आठ कारणांमध्ये 'कोश–शब्द-कोश' हें एक महनीय कारण आहे. अर्थात 'पद-पदार्थ ज्ञानम् वाक्यार्थ ज्ञानं प्रतिकारणम्' पद-पदार्थाचें ज्ञान वाक्यार्थज्ञानास कारण असतें. म्हणून अभंगांच्या प्रथमोपस्थित अर्थाचें, सरलार्थाचें व तात्पर्यविषयीभूत अर्थाचें ज्ञान अचूक व परिपूर्ण रूपांत होण्याच्या दृष्टीनें 'शब्दार्थ-कोशा'ची अत्यंत आवश्यकता आहे. ती आवश्यकता या प्रस्तुत शब्दार्थ कोशानें भागविण्याचें मोलाचें कार्य केलें आहे. म्हणून मा० श्री० मु० श्री० कानडे व मा० श्री० रा० शं० नगरकर यांनीं हें कार्य करून अभ्यासकांस ऋणाईत केलें आहे.

तसेंच शब्द-शक्ति अचिंत्य आहे. वेदाच्या व संतांच्या महावाक्यरूप शब्दानेंच ब्रह्मात्मैक्याकार अपरोक्ष बुद्धि होते. आपले विचार, भाव-भावना आपण इतरांस व्यक्त करून सांगतों तें शब्दद्वारांच. व्यवहार व परमार्थ याचें शब्दाचे ठायी असलेलें निर्वाहकत्त्व जाणूनच श्रीतुकाराज महाराज म्हणतात–

**शब्द हा बहुसार उपकाराची राशी।** किंवा–
**आम्हाघरीं धन शब्दांचींच रत्नें। शब्दांचींच शस्त्रें (शास्त्रें) यत्न करूं ॥ १॥**



**शब्दाचि आमुच्या जीवाचें जीवन। शब्द वाटूं धन जन लोकां ॥ २॥**
**तुका म्हणे पाहा शब्दचि हा देव। शब्देंचि गौरव पूजा करूं ॥ ३॥**

नाम-नामींत भेद नसल्यामुळें भगवन्नामरूपी शब्दच 'देव' आहे. या शब्दरूपी देवाचा शब्दद्वारांच गौरव करून त्याची उचित पूजा करूं. अभंग-संहितात्मक काव्यरूप शब्दज्ञापक असल्यामुळें प्रमाणत्वावच्छेदानें 'शब्द-प्रमाणरूप' आहे. शास्त्रोपदेश-व्यवहाराचें व व्यवहार-निर्वाहांचें साधन दार्शनिक शब्द व व्यावहारिक शब्दच आहेत. तसेंच परमार्थव्यवहाराचें व अनुभूतिप्रदानाचें साधन वैदिक शब्दच आहेत व संतांचे शब्दच आहेत. म्हणून उपदेशरूपी शब्द, वैदिक शब्द, संतांचे अनुभूति व आशयघनशब्द आणि हरिनामरूपी शब्द किंवा वैयाकरणी ज्यास 'स्फोटरूप' नित्य शब्द मानतात, ते सर्वहि शब्द अर्थात् उपर्युक्त समस्त शब्द देव आहेत व त्यांच्यायोगें होणारीं फलेंहि अनेकविध आहेत.

श्रीतुकाराम महाराजांची गाथा म्हणजे 'श्रीतुकाराम महाराजांची वाङ्मयमूर्ति' आहे त्या अभंग-गाथेंतील शब्दांचा अर्थ अभ्यासपूर्णतेनें लिहून त्या वाङ्मयमूर्तिस्वरूप श्रीतुकाराम महाराजांची गौरवपूर्ण पूजाच प्रस्तुत शब्दकोशद्वारां बांधली आहे असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं.

तसेंच शब्दकोशाचे शेवटीं 'परिशिष्ट' म्हणून विशेषनामें, वृक्ष-वेली-वनस्पति इ०, पशु-पक्षी, एकार्थी जोडशब्द, अरबी फार्शी शब्द, म्हणी वा वाक्प्रचार, हीं वा यासम सदरें दिलीं आहेत. तीं देखील अभ्यासकास उपयुक्त व उद्‌बोधक आहेत.

लेखकांनीं परिश्रमपूर्वक, अभ्यासपूर्वक आणि परमादरपूर्वक 'श्रीसंत तुकाराम महाराज-गाथा-शब्दार्थ-कोश' तयार करून वाचकांस, अभ्यासकांस व उपासकांस उपलब्ध करून दिला आहे. त्याची उपयुक्तता जाणून सर्वांनीं हा शब्दकोश आपले संग्रहीं ठेवावा म्हणजे श्रीतुकाराम महाराजांच्या अभंगांचा अर्थ समजण्यास अत्यंत उपयोग होईल; हें खास.

लेखकांकरवीं अशीच वाङ्मयसेवा उत्तरोत्तर व्हावी, ही ईशचरणीं प्रार्थना!

**किसनमहाराज साखरे**

# पुरस्कार

संत साहित्याचे ज्येष्ठ आणि मर्मज्ञ अभ्यासक डॉ० मु० श्री० कानडे आणि श्री० रामभाऊ नगरकर यांनी सिद्ध केलेला संत तुकाराम महाराजांच्या गाथेचा शब्दकोश मराठी कोशरचनाक्षेत्रात आणि तुकारामअभ्यासक्षेत्रात मोलाची भर टाकणारा आहे. वस्तुतः तुकोबांचे अभंग आणि मराठी कोश यांच्यात मूळचाच असा आंतरिक संबंध आहे. प्रसिद्ध मराठी कोशकारांनी मोल्सवर्थ, दाते-कर्वे अशा नामवंतांनी आपापले मराठी शब्दकोश निर्माण करताना, शब्दार्थ देताना तुकोबांच्या अभंगांचा भरपूर वापर केलेला आहे; परंतु दुर्दैवाने तुकोबांच्या गाथेचाच शब्दकोश करण्याचे कोणाला सुचले नाही. 'तुका म्हणे नाही चालत तातडी। प्राप्त काळ घडी आल्याविण' हे तुकोबांचे वचनच प्रमाण मानून ती प्राप्तकाळघडी आता कानडे-नगरकरांमुळे आलेली आहे याबद्दल समाधान मानून उभयतांचे मनःपूर्वक अभिनंदन करायला हवे. एक मोठी उणीव भरून काढली म्हणून त्यांना धन्यवादही द्यायला हवेत. यापूर्वीही उभयतांनी संतविषयक लेखांचा सूचिग्रंथ, संत ज्ञानदेवांच्या गाथेची चिकित्सक आवृत्ती असे महत्त्वाचे प्रकल्प हाती घेऊन पूर्ण केले आहेत व प्रस्तुत शब्दकोश सिद्ध करूनही ते थांबलेले नसून पुढील कामासाठी कंबर कसून तयार आहेत. त्यांच्या या निरपेक्ष व निरलस चिकाटीबद्दल सर्व अभ्यासकांना त्यांचा अभिमान तर वाटायला हवाच पण होता होईल तो त्यांचा आदर्श पुढे ठेऊन त्यांनी त्यांच्याकडून प्रेरणाही घ्यायला हवी.

तुकोबांच्या अभंगवाणीमुळे मराठीला शब्दसंपत्तीचा विपुल लाभ होऊन ती समृद्ध झालेली आहे, ही गोष्ट निर्विवाद आहे. परंतु ही संपत्ती जतन करण्याचे काम मात्र आपले आहे. आता शब्दांचे अर्थ माहीत नसतील तर तिचे जतन होणे अशक्य आहे. अर्थ समजावून न घेता वेदपठण करणाऱ्या वैदिकांवर तुकोबांचा आक्षेप आपणाला ठाऊक आहेच. शब्दसंपत्तीबरोबर अर्थसंपत्ती नसेल तर शब्दांची किंमत खुळखुळ्यांइतकीच – निरर्थक ध्वनी उत्पन्न करणारी खेळणी. तेव्हा निदान तुकोबांच्या वाट्याला तरी शब्दार्थयुग्मातील एकाची दुसऱ्यापासून फारकत पाहायची वेळ यायला नको. कानडे-नगरकरांना धन्यवाद देणे कर्तव्य ठरते ते यामुळेच.

एकतर दिवसेंदिवस प्राचीन मराठीचा अभ्यास करणारे विद्वान कमी होत चालले आहेत आणि दुसरे असे की, अगदी सध्याच्या मराठीचे स्वरूपही माध्यमांच्या रेट्यामुळे

बदलत चालले आहे. अशा वेळी मराठीला पायाभूत असलेली शब्दसंपत्ती तिच्या अर्थासकट जपण्याचे काम कानडे-नगरकरांनी केलेले आहे.

आणखीही एका मुद्याचा उल्लेख करणे आवश्यक वाटते. तुकोबांची शब्दकळा ही त्यांच्या कवितेमधील शब्दकळा आहे. भाषेचा वापर करणाऱ्या इतर सर्वांप्रमाणे कवीलाही भाषेचे नियम पाळावे लागतात. परंतु जेव्हा आणि जिथे हे नियम कवीच्या सर्जकतेच्या आड येतात, त्याच्या प्रतिभेचा अडथळा ठरतात, तेव्हा आणि तेथे तो त्यांना एक सर्जनशील मुरड घालतो. ही गोष्ट ज्या भाषानियमांबाबत खरी आहे त्यांच्यात शब्दार्थ नियमांचाही समावेश होतो. याचा परिणाम म्हणजे कवीच्या शब्दांचा अर्थ सांगणे प्रसंगी फार अवघड बनते. याबद्दल वादही संभवू शकतात. तुकोबांच्या काव्यात्मक वाक्यविन्यासाचा विचार कोशकर्त्यांनी त्यांच्या प्रस्तावनेत नमुने देत केलेला आहेच. परंतु त्याचबरोबर शब्दांचा प्रचलित अर्थ सोडून तुकोबा त्यांना नवे अर्थ कसे देतात याचीही उदाहरणे त्यांनी दिलेली आहेत. तुकोबांच्या वाङ्मयात आज आपणास अपरिचित वाटणारे शब्द आढळून येतात, त्यांचीही उदाहरणे देऊन ते त्या काळात प्रचलित व म्हणून परिचित असावेत असे कोशकारांनी म्हटले आहे. या शब्दांपैकी काही शब्द तुकोबांची नवनिर्मिती असण्याची शक्यता नाकारता येत नाही. तुकोबांसारख्या एखाद्या महाकवीच्या शब्दप्रयोगांचा कोणी अभ्यास करायचे ठरवले तर त्याला अशा कोशांचा फार चांगला उपयोग होईल.

तुकोबांच्या जन्मकालाबद्दलच्या एका मताप्रमाणे त्यांच्या जन्मास ४०० वर्षे होत आहेत. त्याचे निमित्त व औचित्य या कोशाच्या प्रकाशनाला लाभत आहे हे ठीकच झाले. पण त्याहीपेक्षा महत्त्वाची बाब की तुकोबांच्या निर्याणाला ३५० वर्षे होत आहेत, याबद्दल कोणाचेही दुमत नाही. तेव्हा या वैकुंठगमनत्रिशतकोत्तर सुवर्णसोहळा-वर्षात प्रस्तुत कोश सिद्ध करून कानडे-नगरकरांनी त्यांचा हेवा वाटावा अशी सारस्वतसेवा आणि तुकारामसेवा करण्याचे भाग्य हस्तगत केले आहे. त्यांची ही भाग्यरेषा आणखी विस्तारो आणि ठळक होवो व त्यासाठी त्यांना दीर्घायुरारोग्य लाभो अशी श्रीपांडुरंगचरणी प्रार्थना.

**सदानंद मोरे**
प्रमुख, संत ज्ञानदेव अध्यासन
पुणे विद्यापीठ
पुणे ४११ ००७.

# संपादकांचे मनोगत

"तुका झालासे कळस" या चरणांमध्ये व्यक्त झालेली संत तुकारामांची महती सर्वमान्य झाली आहे. मुद्रणकालापूर्वी तुकारामांचे अभंग कमी अधिक प्रमाणात उतरवून घेतलेली अनेक बाडे निरनिराळ्या ठिकाणी विखुरलेली होती, असे आज प्रकाशित झालेल्या विविध संशोधनाअंती ध्यानात येते. महाराष्ट्रात मुद्रणाला प्रारंभ झाल्यानंतर प्रथमत: कै० माधव चंद्रोबा डुकले यांनी इ० स० १८६२ मध्ये शिळाप्रेसवर छापलेला तुकारामांच्या गाथ्याचा पहिला भाग प्रसिद्ध केला आणि इ० स० १८६८ पर्यंत पाच भागांत उपलब्ध अभंगांची संहिता वाचकांसमोर ठेवली.

तेव्हापासून आजपर्यंत अनेक संपादकांच्या तुकाराम गाथ्याच्या अनेक आवृत्त्या प्रकाशित झाल्या आणि होत आहेत. यामध्ये केवळ मूळ संहिता देणारी गाथा, सटीप गाथा व सार्थ गाथा असे तीन प्रकार उपलब्ध आहेत. दुसऱ्या व तिसऱ्या प्रकारातील काही गाथ्यांमध्ये संपादकांनी अवघड शब्दांचे अर्थ तळटीपांतून दिले आहेत तर काहींनी कठीण शब्दाचा अर्थ सांगणारे कोश शेवटी जोडले आहेत. यांपैकी कै० मा० कृ० देशमुख व कै० सोनोपंत दांडेकर या दोघांनी संपादित केलेल्या गाथ्याला जोडलेला शब्दकोश सर्वांमध्ये विस्तृत आहे. तरीही त्या कोशामध्ये अनेक दुर्बोध शब्द समाविष्ट करण्याचे राहून गेले आहे.

तुकाराम-गाथ्यातील सर्व शब्द एकत्रित करणारा शब्दकोश गेल्या १५० वर्षांत तयार झाला नाही. संतवाङ्मयाचे विद्यार्थी या नात्याने संत तुकारामांचे अभंग अभ्यासताना आम्हांला ही उणीव फार तीव्रतेने जाणवली व त्या दृष्टीने आपण काही प्रयत्न करून पाहावा असा विचार आमच्या मनांत आला. सन १९९८-९९ या दोन वर्षांना संत तुकारामांच्या जीवनात फार महत्त्वाचे स्थान आहे. संत तुकारामांच्या जन्मवर्षाविषयी जी विविध मते आहेत त्यामध्ये शके १५२० म्हणजे इ० स० १५९८ असे एक मत आहे. हे मत आम्ही ग्रंथनिर्मितीचे ध्येय साधण्यासाठी म्हणून स्वीकारले आणि कोशकामाला प्रारंभ केला. तुकारामांच्या जन्माला ४०० वर्षे पूर्ण होतात तोपर्यंत हे काम पूर्ण करावे असे आम्ही ठरविले. त्याचबरोबर इ० स० १९९९ हे वर्ष तुकारामांच्या निर्याणाला ३५० वर्षे पूर्ण करणारे आहे असा उभय विचार मनात धरून आम्ही हा शब्दकोश इ० स० १९९९ मध्ये अभ्यासकांच्या हाती देत आहोत.

या कोशासाठी आम्ही पूर्वीच्या आधिकारी व्यक्तींनी तयार केलेले तुकारामांचे गाथे आमच्या आधारासाठी घेतले आहेत. त्यापैकी कै० जोगमहाराज, कै० सोनोपंत दांडेकर आणि डॉ० प्र० न० जोशी यांच्या गाथ्यांचा आम्ही वारंवार उपयोग केला. त्यांच्या गाथ्यांमुळे शब्दार्थ निश्चित करण्यास फार मदत झाली. त्याबद्दल त्यांच्या संबंधीची कृतज्ञता व्यक्त करावी तेवढी थोडीच आहे.

तुकारामांच्या अभंगांतील काही शब्दांचे अर्थ सहज उलगडता येत नाहीत असे कै० जोगमहाराज, कै० सोनोपंत दांडेकर यांच्यासारख्या थोर पुरुषांनी म्हटलेले आहे. आम्ही आमच्या स्वल्पमतिनुसार गाथ्यातील प्रत्येक शब्दाचा अर्थ देण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामध्ये काही त्रुटी राहून जाणे अगदी शक्य आहे. तुकाराम-गाथ्याच्या जाणकारांनी या त्रुटी आमच्या नजरेस आणाव्या अशी त्यांना विनंती आहे.

या कोशकार्याच्या प्रकाशनासाठी देहूच्या संत तुकाराम संस्थानाने ११०००/- रुपयांची उदार देणगी दिली. त्याचप्रमाणे पुणे विद्यापीठाच्या संत ज्ञानदेव अध्यायनानेही प्रकाशनासाठी १०,०००/- रुपयांचे अनुदान दिले आहे. या दोन्ही देणग्या मिळवून देण्याच्या बाबतीत आमचे मित्र व संत ज्ञानदेव अध्यासनाचे प्राध्यापक डॉ० सदानंद मोरे यांनी खूप प्रयत्न केले त्याबद्दल आम्ही त्यांचे मनःपूर्वक आभारी आहोत. तसेच आमदार रामकृष्ण मोरे यांनाही धन्यवाद देणे अगत्याचे आहे.

आमच्या संत कार्याविषयी सदैव आपुलकी बाळगून भरीव स्वरूपाची मदत करणारे ह० भ० प० किसनमहाराज साखरे यांनीही या प्रकाशनासाठी १०,०००/- रुपये मिळवून देऊन आम्हांला उपकृत केले आहे. या सर्वांनी आमच्या पुढील कामासाठी अशीच कृपादृष्टी ठेवावी अशी त्यांना नम्र विनंती आहे. वारकरी संप्रदायाचे धुरीण आदरणीय श्री० किसनमहाराज साखरे यांना विनंती केल्याबरोबर आमच्या कोशासंबंधी आपला आशीर्वादपर अभिप्राय पाठवून दिला. त्याचप्रमाणे श्री ज्ञानदेव अध्यासनाचे प्राध्यापक आमचे मित्र डॉ० सदानंद मोरे यांनी शब्दकोशाला पुरस्कार लिहून दिला. या दोघांचेही आम्ही कृतज्ञ आहोत

रामदासी प्रेरणा प्रसारक समुदायातील श्री० रमण चितळे यांनी कोशाच्या प्रकाशनासाठी येणाऱ्या सर्व अडचणी ध्यानात घेऊनही या कोशाच्या प्रकाशनाची जबाबदारी स्वीकारली याबद्दल आम्ही त्यांना मनःपूर्वक धन्यवाद देतो.

श्रीतुकारामबीज, **मु० श्री० कानडे**
शक १९२१ **रा० शं० नगरकर**

# प्रकाशकीय

साधु दिसती वेगळाले। परी ते स्वरूपीं मिळाले।
अवघे मिळोन येक चि जाले। देहातीत वस्तु॥ ७-२-३१

– श्रीमद्दासबोध

श्रीज्ञानेश्वर-नामदेव-एकनाथ-तुकाराम-समर्थ हे संत म्हणजे महाराष्ट्राचे पंचप्राण होत. रामदासी मंडळींना श्रीसमर्थ हे मायबाप असले तरी ज्ञानेश्वर महाराज, नामदेव महाराज, एकनाथ महाराज आणि तुकाराम महाराज हे संतश्रेष्ठ हे आपल्या काकांसारखे वाटतात. श्रीसमर्थांबद्दल त्यांना जें भक्तिप्रेम असतें तसेंच इतरांबद्दलहि वाटतें. श्रीकल्याणांनीं जी संतमाळा केली आहे, ती या वस्तुस्थितीचें प्रातिनिधिक उदाहरण होय. ह्या हद्दीपकांनीं उजळून टाकलेला मार्ग तोच महाराष्ट्रधर्म. रामदासी कवींनीं ह्यांना कधीं वेगळें मानलें नाहीं, आत्मारामबुवा चोरेगांवकर या रामदासी कवीनें गीतेवरील आपल्या एका प्रकरणांत श्रीतुकोबारायांची प्रशस्ती मोठ्या प्रेमानें गाइली आहे. वारकरी आणि रामदासी उपासना ह्या भागवतपंथाच्या एकाच नाण्याच्या दोन बाजू होत. श्रीसमर्थांना परकें मानण्याची प्रवृत्ति अलिकडेच डोकावूं लागली आहे. रामदासी परिवारांत इतरांबद्दलच्या दुराव्याला कधींहि स्थान राहिलेलें नाहीं आणि राहाणारहि नाहीं. असा नुसता वारा म्हणजे सुद्धा महान् संततत्त्वाचा उपमर्द ठरेल. ही जाणीव असल्यामुळेंच रामदासी प्रेरणा प्रसारक समुदायाला श्रीतुकोबारायांच्या अतुल्य वाङ्मयाच्या व्यासंगाला होईल तितका हातभार लावणें हें आपलें परमकर्तव्य वाटतें. जीवन-साफल्यासाठीं संतांनीं केलेल्या उपदेशाचें "राम कैवारी करा रे," हें सार आहे. महाराष्ट्राला आपल्या जीवनाची काळजी असेल तर तो ह्या सारतत्त्वावरून आपली दृष्टि कधीहि ढळूं देणार नाहीं. ह्या अमर तत्त्वज्ञानानें मराठी आयुष्याचें उद्यान फुलत आलें आहे. ह्या तत्त्वज्ञानाच्या सम्यक् आकलनाला सहायक होणारा हा कोश पं० कानडे आणि पं० नगरकर ह्यांनीं आपल्या प्रदीर्घ आणि चिकाटीच्या प्रयत्नांनीं रचला आहे. अशा ह्या कोशाच्या प्रकाशनाची संधि मिळाल्याबद्दल रामदासी प्रेरणा प्रसारक समुदायाला धन्यता वाटते.

शब्द हें संस्कृतीचें वाहन आहे आणि जीवनाचें माध्यम आहे. शब्द हें भगवद्दर्शनाचें अमोघ साधन असल्यानेंच श्रीतुकारामांनीं शब्दाला अपरंपार महत्त्व देऊन देवपदाला नेऊन बसविलें आहे. शब्दाचा एवढा गौरव खरोखर अपूर्व होय. ह्या कोशाचा उपयोग नानाविध

दृष्टींनीं आहे. श्रीतुकोबारायांच्या अमृतवाणीचा गभीर बोध होण्यासाठीं जसा आहे तसाच साडेतीनशे वर्षांपूर्वींच्या मराठीचें दर्शन घडविण्यासाठींहि आहे. भाषाशास्त्राला अन् शब्दशास्त्राला आहे तसा भाषिक इतिहासालाहि आहे. मराठी भाषेच्या आजच्या पडत्या काळांत तिच्या पुनरुत्थानाला बळ प्राप्त होण्यासाठीं ह्या कोशाचा उपयोग होण्यासारखा आहे. मराठी मन संतवाणीला वेदवाणी आणि संजीवनी मानतें. भौतिकतेनें आणि आधुनिकतेनें आज जीवनांत निर्माण केलेल्या आव्हानांचा निरास करण्याचें शक्तिमत्त्व केवळ संतवाणीच्या कृपाश्रयानेंच लाभणारें आहे. म्हणून जीवनाच्या खऱ्या ध्येयावर प्रकाश पाडणाऱ्या संतग्रंथप्रदीपावलीचा संकल्प सोडला आहे. मराठीच्या लेकरांचें ह्या कोशाकडे लक्ष जावो, अशी श्रीचरणीं प्रार्थना आहे.

श्रीरामनवमी,
शिवशक ३२५

श्रीरामदासी प्रेरणा प्रसारक समुदायाकरितां
**अनंत भालचंद्र चितळे**

# प्रस्तावना



## या शब्दकोशाची आवश्यकता

संत तुकाराम हे मध्ययुगीन मराठी वाङ्मयाच्या इतिहासातील एक अत्यंत प्रभावी संतकवी आहेत. आजवर त्यांच्या गाथ्याच्या ज्या अनेक आवृत्त्या निघाल्या व पुन्हा पुन्हा निघत आहेत, त्यावरून त्यांच्या अभंगवाणीच्या लोकप्रियतेचीही कल्पना येते. 'अभंगवाणी प्रसिद्ध तुकयाची' या वचनाचा आजही प्रत्यय येतो. 'ज्ञानचंद्रोदय' मासिकात संत तुकारामांच्या अभंगांचे प्रकाशन इ० स० १८४४ पासून प्रथम सुरू झाले. हे प्रकाशन स्फुट स्वरूपाचे होते. नंतर ठिकठिकाणच्या हस्तलिखित वह्यांमधून मिळणारे अभंग एकत्रित करून ते एकत्रित छापण्याची कल्पना प्रथमतः कै० माधव चंद्रोबा यांच्या मनात आली आणि त्यांनी प्रकाशित केलेल्या तुकारामगाथ्याची इ० स० १८६८ मध्ये पूर्णता झाली. तेव्हापासून आजअखेर म्हणजे १९९७ अखेर गाथ्यांच्या अनेक आवृत्त्या प्रकाशित झाल्या व होत आहेत. त्यांची निश्चित संख्या सांगणेही कठीण आहे. गाथे सतत प्रकाशित होत असतानाही गाथ्याचा संपूर्ण शब्दकोश सिद्ध करण्याचा एकही प्रयत्न झाला नाही. काही संपादकांनी लहान लहान शब्दकोश गाथ्यालाच जोडलेले आहेत; परंतु समग्र शब्दकोश आजअखेर तयार झाला नाही. भाषा व विचार या दोनही दृष्टींनी तुकारामांचे अभंग हा महत्त्वाचा टप्पा असल्याने त्याचा समग्र शब्दकोश उपलब्ध असणे अत्यावश्यक आहे, असे आम्हास वाटले आणि म्हणूनच संतवाङ्मयाचे अभ्यासक या नम्र भूमिकेतून आम्ही हा शब्दकोश तयार करण्याचे ठरविले. संत तुकारामांचा पारमार्थिक क्षेत्रातील अधिकार फार मोठा आहे. त्यामुळे त्यांच्या सर्व शब्दांचा सर्वमान्य अर्थ करणे हे अवघड झाले आहे. वै० ह० भ० प० सोनोपंत दांडेकरांच्यासारखे अधिकारी भाष्यकारही 'श्रीतुकोबांचे सर्व अभंग लागणे, ही जवळजवळ अशक्य कोटीतील गोष्ट आहे. याकरता जेवढे समजले तेवढ्या शब्दांचे अर्थ दिले आहेत.' असे म्हणतात. या विचारांमुळेच आम्हाला प्रेरणा मिळाली आणि आम्ही हे काम केले.

हा कोश इ० स० १९९८ मध्ये प्रकाशित करण्यामागे आणखी एक महत्त्वाचे कारण आहे. संत तुकारामांच्या जन्मवर्षासंबंधी जी विविध मते आहेत त्यांमध्ये शके १५२० (इ० स० १५९८) हे एक मत आहे. चालू वर्षी या घटनेला ४०० वर्षे पूर्ण होतात. हा

योग साधून हा कोश इ० स० १९९८ मध्येच प्रकाशित व्हावा म्हणून शक्य तेवढ्या नेटाने आम्ही हा कोश तयार करून तो अभ्यासकांच्या स्वाधीन करीत आहोत.

## शब्दकोशासाठी घेतलेली आधार-प्रत

तुकारामांच्या गाथ्याची अधिकृत अशी एकही प्रत उपलब्ध नाही. कै० वि० ल० भावे यांनी संताजी तेली यांच्या वह्यांवरून तयार केलेला 'तुकारामांचा अस्सल गाथा', ह० भ० प० गंगुकाका शिरवळकर यांच्याजवळील हस्तलिखितावरून आर्यभूषण छापखान्याने प्रकाशित केलेला गाथा आणि सोपानकाका देहूकर यांचा 'देहूकर सांप्रदायिक ओळीची गाथा' इ० गाथे हे सर्व गाथ्यांचे मूळ आहे, असे मानले जाते. इ० स० १८६९ मध्ये त्यावेळच्या मुंबई सरकारने कै० शं० पां० पंडित आणि कै० विष्णु परशुरामशास्त्री पंडित यांच्याकरवी तुकाराम गाथा प्रकाशित केला. त्यांनी हा गाथा प्रकाशित करताना तळेगाव, देहू, पंढरपूर आणि कडूस येथील वह्यांचा आधार घेतलेला होता आणि त्याला वारकरी संप्रदायातील त्यावेळचे एक धुरीण श्री० भाऊ रामचंद्र काटकर (सोलापूरकर) यांनी मान्यताही दिलेली होती.

नंतर स्वातंत्र्योत्तर काळात मुंबई शासनाच्या-वतीने इ० स० १९५० मध्ये गाथा प्रकाशित करण्यात आला. तुकाराम महाराजांच्या निर्याणाला ३०० वर्षे पुरी झाली, हे या गाथ्याच्या प्रकाशनाला निमित्त होते. हाच गाथा प्रमाण मानून डॉ० प्र० न० जोशी यांनी आपला सार्थ तुकाराम गाथा तीन खंडात (इ० स० १९६६, १९६८ व १९६९) प्रकाशित केला. संत तुकारामांचे अनेक गाथे यावेळेपर्यंत प्रकाशित झाले असले तरी आम्ही डॉ० प्र० न० जोशी यांनी संपादित केलेला गाथा हाच शब्दकोशासाठी स्वीकारला आहे.

शब्दांचे अर्थ निश्चित करण्यासाठी वरील गाथ्याबरोबरच आम्ही वै० विष्णुबुवा जोग यांचा सार्थ गाथा, ह० भ० प० देशमुख, दांडेकर यांनी आपल्या गाथ्याला जोडलेला विस्तृत शब्दकोश, तसेच ह० भ० प० वै० शंकरमहाराज खंदारकर यांनी दोन भागांत प्रकाशित केलेले 'श्रीतुकाराम महाराज गाथाभाष्य' इत्यादींचा आधार घेतला आहे.

## शब्दकोश-रचनाधोरण

१) या शब्दकोशात प्रथम प्रत्येक शब्दाचे मूळरूप दिलेले आहे. नंतर कंसात त्याचे व्याकरण व पुढे अर्थ सांगितला आहे. त्यानंतर त्याचा संदर्भ दिलेला आहे. पण गाथ्यातील त्या शब्दाचे यच्चयावत संदर्भ दिलेले नाहीत. साधारणतः प्रत्येक शब्दाचे ३-४ संदर्भ दिलेले आहेत. शब्दाचे मूळरूप दिल्यानंतर त्या शब्दापासून तयार होणारे सामासिक शब्द मूळ शब्दरूपाच्या खाली अभंगांच्या क्रमानुसार दिलेले आहेत. तुकारामांच्या अभंगात वारकरी संप्रदायाच्या दृष्टीने ज्या शब्दांना विशेष स्थान आहे, अशा शब्दांचे मात्र सर्व संदर्भ नोंदले आहेत.



(उदा० वारी, वारकरी, विष्णुदास, वैष्णव इ०)

२) एकच शब्द एकाच रूपात आणि एकाच अर्थाने आला असेल तर त्याची एकच नोंद केली आहे.

३) जेथे एका शब्दाचे दोन अर्थ संभवतात असे वाटले तेथे एका अर्थानंतर स्वल्पविराम देऊन दुसरा अर्थ दिला आहे.

४) एकाच शब्दाचे संदर्भानुसार अनेक अर्थ होतात, अशी अनेक उदाहरणे आढळून आली. त्यावेळी प्रत्येक अर्थाला वेगळा क्रमांक देऊन त्या ठिकाणी तो अर्थ सांगितला आहे.

५) एकाच शब्दाचे भिन्नभिन्न प्रकाराने लेखन होणे, हा प्रकार गाथ्यात भरपूर प्रमाणात आढळतो. अशा वेळी प्रचलित रूप देऊन तेथेच सर्व संदर्भ दिले आहेत आणि इतर रूपांची कोशामध्ये आनुपूर्वीप्रमाणे नोंद करून त्यापुढे 'पाहा' अशी सूचना दिली आहे. (उदा० शिण – सिण यातील शिण शब्द प्रथम देऊन 'पाहा सिण' अशी नोंद केली आहे.)

६) आधारप्रतीत ऱ्हस्व-दीर्घांचे निश्चित बंधन अनेक शब्दांच्या बाबतीत पाळलेले नाही. उदा० भूक, भुक अशा वेळी आम्ही प्रचलित रूप घेतले आहे.

७) एकाच चरणातील सामासिक शब्द तोडून दोन चरणात विभागणे, असा प्रकार अनेकदा आढळतो. उदा० 'तुका म्हणे कुळ। दंड आमुचिये दैवते।' (अ० क्र० ४१५) यातील कुळ व दैवते हे वेगळे झालेले घटक एक करून 'कुळदैवते' असा शब्द कोशात घेतला आहे.

८) याचबरोबर सामासिक शब्दातील घटकांची उलटापालट झाल्याचेही लक्षात आले म्हणून तिथेही ते शब्द सुसंगत करून घेतले आहेत. उदा० दशा – यौवन = यौवन दशा (अ० क्र० ६५१), माळ – तुळशी = तुळसीमाळ (अ० क्र० ६८४) शब्दांची ही जोडणी करीत असताना अर्थाला बाधा येणार नाही याची काळजी घेतली आहे.

९) आधारप्रतीत 'तुकया बंधू' या नाममुद्रेने तुकारामांचे बंधू कान्होबा यांचे अभंग समाविष्ट झालेले आहेत. त्या अभंगांतील शब्दांच्या नोंदी कोशात घेतलेल्या नाहीत.

१०) गाथ्यातील हिंदी अभंगही शब्दकोशातून वगळले आहेत.

## शब्दसंग्रहाचे स्वरूप

तुकारामांच्या शब्दसृष्टीचा विचार करण्यापूर्वी त्यांच्या जीवनाची बैठक थोडक्यात समजावून घेतली पाहिजे. त्यांच्या सर्व अभंगांला परमार्थाची पार्श्वभूमी आहे हे स्पष्टच आहे; परंतु तुकाराम परमार्थमार्गाकडे कोणत्या कारणाने वळले हे त्यांनी स्वतःच

**याती शूद्र वंश केला वेवसाव।**
**आदि तो हा देव कुळपूज्य॥** (अ० क्र० १३३३)

योग साधून हा कोश इ० स० १९९८ मध्येच प्रकाशित व्हावा म्हणून शक्य तेवढ्या नेटाने आम्ही हा कोश तयार करून तो अभ्यासकांच्या स्वाधीन करीत आहोत.

## शब्दकोशासाठी घेतलेली आधार-प्रत

तुकारामांच्या गाथ्याची अधिकृत अशी एकही प्रत उपलब्ध नाही. कै० वि० ल० भावे यांनी संताजी तेली यांच्या वह्यांवरून तयार केलेला 'तुकारामांचा अस्सल गाथा', ह० भ० प० गंगुकाका शिरवळकर यांच्याजवळील हस्तलिखितावरून आर्यभूषण छापखान्याने प्रकाशित केलेला गाथा आणि सोपानकाका देहूकर यांचा 'देहूकर सांप्रदायिक ओळीची गाथा' इ० गाथे हे सर्व गाथ्यांचे मूळ आहे, असे मानले जाते. इ० स० १८६९ मध्ये त्यावेळच्या मुंबई सरकारने कै० शं० पां० पंडित आणि कै० विष्णु परशुरामशास्त्री पंडित यांच्याकरवी तुकाराम गाथा प्रकाशित केला. त्यांनी हा गाथा प्रकाशित करताना तळेगाव, देहू, पंढरपूर आणि कडूस येथील वह्यांचा आधार घेतलेला होता आणि त्याला वारकरी संप्रदायातील त्यावेळचे एक धुरीण श्री० भाऊ रामचंद्र काटकर (सोलापूरकर) यांनी मान्यताही दिलेली होती.

नंतर स्वातंत्र्योत्तर काळात मुंबई शासनाच्या-वतीने इ० स० १९५० मध्ये गाथा प्रकाशित करण्यात आला. तुकाराम महाराजांच्या निर्याणाला ३०० वर्षे पुरी झाली, हे या गाथ्याच्या प्रकाशनाला निमित्त होते. हाच गाथा प्रमाण मानून डॉ० प्र० न० जोशी यांनी आपला सार्थ तुकाराम गाथा तीन खंडात (इ० स० १९६६, १९६८ व १९६९) प्रकाशित केला. संत तुकारामांचे अनेक गाथे यावेळेपर्यंत प्रकाशित झाले असले तरी आम्ही डॉ० प्र० न० जोशी यांनी संपादित केलेला गाथा हाच शब्दकोशासाठी स्वीकारला आहे.

शब्दांचे अर्थ निश्चित करण्यासाठी वरील गाथ्याबरोबरच आम्ही वै० विष्णुबुवा जोग यांचा सार्थ गाथा, ह० भ० प० देशमुख, दांडेकर यांनी आपल्या गाथ्याला जोडलेला विस्तृत शब्दकोश, तसेच ह० भ० प० वै० शंकरमहाराज खंदारकर यांनी दोन भागांत प्रकाशित केलेले 'श्रीतुकाराम महाराज गाथाभाष्य' इत्यादींचा आधार घेतला आहे.

## शब्दकोश-रचनाधोरण

१) या शब्दकोशात प्रथम प्रत्येक शब्दाचे मूळरूप दिलेले आहे. नंतर कंसात त्याचे व्याकरण व पुढे अर्थ सांगितला आहे. त्यानंतर त्याचा संदर्भ दिलेला आहे. पण गाथ्यातील त्या शब्दाचे यच्चयावत संदर्भ दिलेले नाहीत. साधारणतः प्रत्येक शब्दाचे ३-४ संदर्भ दिलेले आहेत. शब्दाचे मूळरूप दिल्यानंतर त्या शब्दापासून तयार होणारे सामासिक शब्द मूळ शब्दरूपाच्या खाली अभंगांच्या क्रमानुसार दिलेले आहेत. तुकारामांच्या अभंगात वारकरी संप्रदायाच्या दृष्टीने ज्या शब्दांना विशेष स्थान आहे, अशा शब्दांचे मात्र सर्व संदर्भ नोंदले आहेत.



(उदा० वारी, वारकरी, विष्णुदास, वैष्णव इ०)

२) एकच शब्द एकाच रूपात आणि एकाच अर्थाने आला असेल तर त्याची एकच नोंद केली आहे.

३) जेथे एका शब्दाचे दोन अर्थ संभवतात असे वाटले तेथे एका अर्थानंतर स्वल्पविराम देऊन दुसरा अर्थ दिला आहे.

४) एकाच शब्दाचे संदर्भानुसार अनेक अर्थ होतात, अशी अनेक उदाहरणे आढळून आली. त्यावेळी प्रत्येक अर्थाला वेगळा क्रमांक देऊन त्या ठिकाणी तो अर्थ सांगितला आहे.

५) एकाच शब्दाचे भिन्नभिन्न प्रकाराने लेखन होणे, हा प्रकार गाथ्यात भरपूर प्रमाणात आढळतो. अशा वेळी प्रचलित रूप देऊन तेथेच सर्व संदर्भ दिले आहेत आणि इतर रूपांची कोशामध्ये आनुपूर्वीप्रमाणे नोंद करून त्यापुढे 'पाहा' अशी सूचना दिली आहे. (उदा० शिण – सिण यातील शिण शब्द प्रथम देऊन 'पाहा सिण' अशी नोंद केली आहे.)

६) आधारप्रतीत ऱ्हस्व-दीर्घाचे निश्चित बंधन अनेक शब्दांच्या बाबतीत पाळलेले नाही. उदा० भूक, भुक अशा वेळी आम्ही प्रचलित रूप घेतले आहे.

७) एकाच चरणातील सामासिक शब्द तोडून दोन चरणात विभागणे, असा प्रकार अनेकदा आढळतो. उदा० 'तुका म्हणे कुळ। दंड आमुचिये दैवते।' (अ० क्र० ४१५) यातील कुळ व दैवते हे वेगळे झालेले घटक एक करून 'कुळदैवते' असा शब्द कोशात घेतला आहे.

८) याचबरोबर सामासिक शब्दातील घटकांची उलटापालट झाल्याचेही लक्षात आले म्हणून तिथेही ते शब्द सुसंगत करून घेतले आहेत. उदा० दशा – यौवन = यौवन दशा (अ० क्र० ६५५), माळ – तुळशी = तुळसीमाळ (अ० क्र० ६८४) शब्दांची ही जोडणी करीत असताना अर्थाला बाधा येणार नाही याची काळजी घेतली आहे.

९) आधारप्रतीत 'तुकया बंधू' या नाममुद्रेने तुकारामांचे बंधू कान्होबा यांचे अभंग समाविष्ट झालेले आहेत. त्या अभंगांतील शब्दांच्या नोंदी कोशात घेतलेल्या नाहीत.

१०) गाथ्यातील हिंदी अभंगही शब्दकोशातून वगळले आहेत.

## शब्दसंग्रहाचे स्वरूप

तुकारामांच्या शब्दसृष्टीचा विचार करण्यापूर्वी त्यांच्या जीवनाची बैठक थोडक्यात समजावून घेतली पाहिजे. त्यांच्या सर्व अभंगांना परमार्थाची पार्श्वभूमी आहे हे स्पष्ट आहे; परंतु तुकाराम परमार्थमार्गाकडे कोणत्या कारणाने वळले हे त्यांनी स्वतःच

**याती शूद्र वंश केला वेवसाव।**
**आदि तो हा देव कुळपूज्य॥** (अ० क्र० १३३३)

या चरणांनी प्रारंभ होणाऱ्या अभंगामध्ये विशद केलेले आहे. प्राचीन प्रथेप्रमाणे एखाद्या गुरूपाशी अनेक वर्षे राहून त्यांनी वेद, उपनिषदे किंवा गीता यांचे मुळातून अध्ययन करणे हे त्यावेळच्या समाजरचनेमुळे संभवनीय नव्हते; परंतु त्यांच्या अभंगवाणीमध्ये पारमार्थिक विचारांची विखुरलेल्या स्वरूपात मांडणी झालेली अभ्यासकांच्या दृष्टीस पडते. त्यांनी वेदउपनिषदादि ग्रंथांचा अनेकदा उल्लेख केलेला आहे आणि गीता व भागवत या ग्रंथांचे अध्ययन करणे हे आवश्यक मानलेले आहे. हे सर्व त्यांनी कोणत्या मार्गाने मिळविले याचा शोध केला तर त्यांच्यावरील अभंगातील पुढील ओळींवरून उलगडा होतो. त्या ओळी अशा –

**आरंभी कीर्तन करी एकादशी ।**
**नव्हते अभ्यासी चित्त आधीं ।**
**काही पाठ केली संतांची उत्तरे ।**
**विश्वासे आदरे करोनियां ॥**
**गाती पुढे त्यांचे धरावे धृपद ।**
**भावे चित्त शुद्ध करोनियां ॥** (अ० क्र० १३३३)

वरील आत्मनिवेदनावरून हे स्पष्ट होते की, तुकारामांनी पारमार्थिक विचारांची ओळख आपल्या कीर्तनभक्तिद्वारा करून घेतली होती. त्यानंतर त्यांना स्वप्नामध्ये गुरूंचा उपदेश मिळून नामस्मरणाच्या ठिकाणी त्यांचा विश्वास दृढ झाला आणि हीच त्यांच्या कवित्वाची स्फूर्ती ठरली. हे सर्व या अभंगांतूनच स्पष्ट होते. त्यांच्या अभंगांत आढळणारे पारमार्थिक विषयातले अनेक पारिभाषिक शब्द आणि मूळ संस्कृत वचनांना दिलेले मराठी रूप या दोन गोष्टी पाहिल्या म्हणजे त्यांनी स्वतःच सांगितलेल्या त्यांच्या बहुश्रुतपणाची कल्पना येते. या संदर्भात आणखी एक विचारधारा ध्यानात घेण्यासारखी आहे. मराठी संतांचा विचार करताना 'ज्ञानाचा एका आणि नामयाचा तुका' हे वचन वारंवार उद्धृत केलेले आढळते. ज्ञानेश्वरी आणि तुकारामांची गाथा यांचे एकाच वेळी बारकाईने परिशीलन केले म्हणजे ज्ञानेश्वरीचा फार मोठा प्रभाव तुकारामांच्या शब्दांवर व विचारांवर पडलेला आहे, हे सतत जाणवते आणि ज्ञानेश्वरीचे श्रवण हा तुकारामांच्या अध्ययनाचा नित्याचा भाग आहे, असे खात्रीने म्हणता येते. पुढे दिलेल्या उदाहरणांखेरीज आणखी शेकडो साम्यस्थळे दाखविता येतील. पण केवळ नमुना म्हणून पुढील शलाकादर्शन घडविले आहे.

| ज्ञानेश्वरी | गाथा |
|---|---|
| १) पतिव्रता पतीते । जियापरी (३.९२) | १) प्रतिव्रते जैसा पति । (४३६५) |
| २) जैसा गळी मीनु आमिषे । भुलविजे गा ॥ (३.२१३) | २) आमिषाचिये आसे गळ गिळी मांसा । (६८८) |
| ३) हो कां जयाचिया प्रीति । अमूर्त हा आला व्यक्ती ॥ (४.१२) | ३) अमूर्त मूर्तिमंत होय भक्तीच्या सुखे । (१५८०) |
| ४) आता गृहादिक आघवे । ते काही न लगे त्यजावे ॥ (५.२२) | ४) न लगे हा लौकिक सांडावा वेव्हार । घ्यावे वनांतर भस्मदंड ॥ (९६) |
| ५) देखें सोनियाचे निखळ । मेरूयेसणे ढिसाळ । आणि मातियेचे डिखळ । सरिसेंचि मानी ॥ (६.९२) | ५) सोने रूपे आम्हा मृत्तिकेसमान । माणिके पाषाणखडे तैसे ॥ (५२२) |
| ६) म्हणौनि कुळ जाति वर्ण । हे अवघेचि का अकारण ॥ (९.४५२) | ६) याति कुळ येथे असे अप्रमाण । गुणाचे कारण असे अंगी ॥ (३३७) |
| ७) चेइलिया स्वप्न तैसे गेले । (११.१८९) | ७) तुका म्हणे गेले । स्वप्नीचे जागे जाले ॥ (२३१) |
| ८) नाना गाय चरे डोंगरी । परि चित्त बांधिले वत्से घरी ॥ (११.६३५) | ८) रानी हिंडो गेली गाय । घरी वत्स वाट पाहे ॥ (२६५) |
| ९) मग याहीवरी पार्था । माझ्या भजनी आस्था । तरी तयाते मी माथां । मुकुट करी ॥ (१२.२१४) | ९) भावा एकासाठी । खांदा वाहे आपुल्या ॥ (३४६) |



## संस्कृतप्रचुर शब्द

संतांची कीर्तने, प्रवचने ऐकून प्राप्त झालेली बहुश्रुतता आणि ज्ञानेश्वरीचा अखंड अभ्यास यामुळे तुकारामांच्या अभंगांतून दीर्घ सामासिक शब्द विपुल संख्येने आढळतात. तुकारामांची बुद्धिमत्ता प्रखर असल्याची जाणीव जशी त्यांच्या विचारांतून प्रकट झालेली आहे, तशीच ती अशा सामासिक शब्दांतूनही व्यक्त झालेली आहे. कारण सामान्य बुद्धीच्या माणसाला असे शब्द लक्षात ठेवणे आणि त्यांचा प्रसंगानुसार वापर करणे हे शक्य होणार नाही. अशी काही उदाहरणे पुढे दिली आहेत.

(१) सुखसंपत्तिराज्यचाड ६२०, (२) अणुरेणुव्याप्यभरिता ६७३,
(३) संतमहंतसिद्धिहरि-दासदाटणी २२७१, (४) धग्धगितोज्वाळ २४६८,
(५) धनमानजनविन्मुख ३२८४, (६) भाव-भक्तिवाद ४१२३,
(७) प्रचुरीस्वरासहित ४५०३, (८) काळ्याकृतांतधूधूकार ४५५०.

पुढील काही सामासिक शब्दांवरून असे वाटते की, मुळात तुकारामांनी हे शब्द स्वतंत्रपणे उच्चारले असावेत. परंतु ते लिहून घेणाऱ्याने एकत्रित लिहिले. उदा०

१) कामक्रोधलोभस्वार्थ २९४३, २) जन्मजराव्याधि ३८५७,
३) कायामनेवाचा ४०१४, ४) देशकालवस्तुभेद ४३१३,
५) शंखचक्रगदाकमळमंडित ४४१३.

## नवीन शब्द-निर्मिती

तुकारामांचा व्यासंग, समाजव्यवहाराचे बारीक निरीक्षण आणि स्वतंत्र चिंतन यांमुळे त्यांच्या हातून अनेक अर्थपूर्ण असे नवीन शब्द निर्माण झालेले दिसतात. यातील काही शब्द त्यांनी पूर्वकालीन संतांच्या वाङ्मयातूनही घेतले असतील; परंतु तुकारामांनी या शब्दांचा योग्य त्या ठिकाणी वापर करून आपले अभंग परिणामकारक केले आहेत.

उदा० इच्छादानी – इच्छा पूर्ण करणारा ४०, धर्मठक – धर्माच्या नावाखाली ठकविणारा ९८, निरयदंड – नरकवासाची शिक्षा २७१, कंटकवाट – काटेरी मार्ग ३५७, मुखमंडित – सुंदर मुखाचा ६४२, अबळाभुलवणा – स्त्रियांना भुलविणारा ६५८, मतिलंड – बुद्धिभ्रष्ट ७९०, जनबुद्धि – सामान्य लोकांची समजूत ९२२, फटमर – पळपुटा, भ्याड १०७१, ग्रामपशु – कुत्रे १२६२, पिकधरणी – पिकदाणी १७२४, झोंडाई – दांडगेपणा २०२६, प्रीतिउभड – प्रेमाचा उमाळा २६५६, गर्वनिधि – अत्यंत गर्विष्ठ ४५४८, कंठाकंठ – गळामिठी ४५८०.

## अपरिचित शब्द

भाषेच्या व्यवहारात नवीन नवीन शब्द समाविष्ट होत जातात आणि त्याचबरोबर काही शब्दही लुप्त होतात. तुकारामांच्या वाङ्मयात आज आपल्याला अपरिचित वाटणारे शेकडो शब्द आलेले आहेत. परंतु तुकारामांची अभंगवाणी सर्व समाजासाठी असल्याने हे शब्द त्या काळात सर्वांना परिचित असावेत. तसे नसते तर तुकारामांनी त्यांचा वापर केला नसता. असे काही शब्द पुढे दिले आहेत.

वारिके – वाहन ६, गडनी – सोबतीण, मैत्रीण २७, म्हनेरा – तगादा १२८, पावटनी – पायरी १८९, नाभाव – भाव नसण्याची स्थिती ३३८, खाणोरी - खादाड ५६८, अचिंत – निश्चिंत ९५४, उद्भट – कठीण १०५१, हेंड – पशू १३०८, चाभाड – जबडा, तोंड १७१८, भगल – ढोंग १८९२, घुसमांडणे – रगडणे, चिरडणे ३०७८, लगपाट – त्वरा ३२०९, समतुक – समतोल ३४९५, पाठेळ – ओझ्याचे जनावर ३५४६, डेंगा – मूर्ख ३६११, लाडस्य – लाड करणे ३७९०, खीरम्या – उंची वस्त्र ३९०७, देवान्न – मिष्टान्न ३९३४, परताप – प्रताप – दक्षिणा ४१२२, तोंडक – भांडण ४४१७, पाधाणी – अडाणी स्त्री ४४५१, फांजी – नगराचा कोट ४५९८.

## जुन्या शब्दांना नवे अर्थ

भाषेच्या इतिहासात शब्दांचे बहिरंग जसे बदलते तसे त्याच्या अंतरंगातही बदल होत जातो, म्हणजेच त्या शब्दांच्या अर्थातही फेरबदल होत जातात. ज्ञानेश्वर-तुकारामांसारखे युगपुरुष शब्दांचे जुने अर्थ बाजूला ठेवून त्यांना नवीन अर्थ प्राप्त करून



देतात आणि त्यांच्या समाजमनावरील प्रभावामुळे नवे अर्थ व्यवहारात रूढ होतात. तुकारामांनीही अनेक शब्दांना असे नवीन अर्थ प्राप्त करून दिलेले आहेत. पुढे दिलेल्या काही उदाहरणांवरून आपल्याला आज अभिप्रेत असणारा त्या शब्दाचा अर्थ आणि तुकारामांच्या मनातील अर्थ यामध्ये कसा बदल झालेला आहे त्याची कल्पना येते.

| | मूळ शब्द | तुकारामांचा अर्थ | आजचा अर्थ |
|---|---|---|---|
| १) | कूट | निंदा-नालस्ती (१९) | कोडे, समस्या |
| २) | भाडेकरी | ओझेकरी (६७) | भाड्याने राहणारा. |
| ३) | मातणे | व्यापणे (३३१) | उन्मत्त होणे. |
| ४) | सोस | आवड (६४१) | हव्यास. |
| ५) | एकांगी | एकाकी (९५९) | केवळ एका बाजूचा विचार. |
| ६) | सौभाग्यसंपन्न | भाग्यवान (११२७) | पती असलेली स्त्री |
| ७) | ढसाळ | सढळ (१७४८) | पोकळ |
| ८) | रिते | निरर्थक (२१६९) | रिकामे. |
| ९) | आरुष | बोबडे (२५५३) | प्राचीन |
| १०) | हेवा | हाव, इच्छा (२५९५) | मत्सर |
| ११) | एकविध | एकनिष्ठ (२६४०) | एकाच प्रकारचे |
| १२) | अंगरखा | कामचुकार (२८१४) | पायघोळ सदरा |
| १३) | टाचणी | तूट-तोटा (३६१६) | राबवणूक |
| १४) | सज्ञान | पुस्तकी पंडित (४०४९) | वयात आलेला |
| १५) | परदेशी | पोरका (४३८२) | अन्यदेशीय |

## यमकासाठी शब्दांची तोडमोड

तुकाराम विनयाने 'वेडे वाकुडे गाईन' असे आपल्या लेखनाविषयी म्हणतात; परंतु प्रत्यक्षात शब्दयोजनेसंबंधी आणि वृत्तरचनेसंबंधी ते अतिशय दक्ष होते असे आढळून येते. अभंगांची रचना करताना त्यांनी यमकाचा विचार कोठेही दुर्लक्षिला नाही. त्यांच्या अभंगांत दोन प्रकारचे यमकयोजन दिसते. एक म्हणजे अंत्य यमक,

**हेचि दान देगा देवा**
**तुझा विसर न व्हावा (२३०६)**

आणि दुसरे म्हणजे अंत्य-मध्य यमक.

**वैष्णवांची कीर्ती गाइली पुराणी ।**
**साही अठरांजणी चहू वेदी ।। (२०१३)**

यमकरचनेविषयी तुकारामांचा कटाक्ष असल्याने यमक साधण्यासाठी त्यांनी शब्दांची अनेक ठिकाणी तोडमोड केलेली आहे. अशी काही उदाहरणे पुढे दिलेली आहेत.

| मूळ रचना | हवी असलेली रचना |
|---|---|
| १) गोपी लाविला चंदन (१४९३) | लाविला गोपी चंदना |
| २) वसुदेव देवकीची बंद फोडुनी शाळा। (१५७६) | वसुदेव देवकीची फोडुनी बंद शाळा |
| ३) तुका म्हणे त्याचा संग नको शब्द स्पर्शअंग। (१७६७) | अंगस्पर्श |
| ४) सहित लेकुरे राहों सुखे। (१९८४) | लेकुरेसहित राहो सुखे। |
| ५) ओवाळूनि नामा तुझ्या वरूनि टाकिलो। (२२४६) | तुझ्या नामावरून ओवाळूनि टाकिलो। |
| ६) प्रेम आता पाजी रस। (२८१३) | प्रेम रस आता पाजी। |

## शब्दघटकांची उलटापालट

काही वेळा तुकाराम सामासिक शब्दांचा जो रूढ क्रम असतो त्याची रचनेच्या सोईसाठी उलटापालट करताना दिसतात. उदा०

| तुकारामकृत शब्द | योग्य शब्द |
|---|---|
| १) सहस्रसोळा (१११२) | सोळा सहस्र. |
| २) योगभाग्ये (१४११) | भाग्ययोगे. |
| ३) मंडित चतुर्भुजा (१५७५) | चतुर्भुजामंडित. |
| ४) अस्तउदयाची (२०११) | उदयास्ताची. |
| ५) वाईटबरे (३५४०) | बरे वाईट. |
| ६) वृत्तितमा (३७०६) | तमोवृत्ति. |
| ७) पुण्यपाप (४१३९) | पापपुण्य. |

## नामधातू

भाषेत 'नाम' म्हणून समजल्या जाणाऱ्या शब्दांचा क्रियापदासारखा वापर करणे ही लकब मराठी भाषेच्या इतिहासात सर्वच काळात प्रचलित असलेली दिसते. तुकारामांनीही असे अनेक नामधातू वापरले आहेत.

| नाम | नामधातू |
|---|---|
| लुब्ध | लुब्धणे (१८९) |
| हुशार | हुशारणे (१९०) |
| वमन | वमिणे (८१४) |
| होम | होमणे (१२१०) |
| ज्वर | ज्वरणे (२१६५) |
| हुताशन | हुताशणे (२६७०) |
| गोड | गोडावणे (२६८५) |
| चेष्टा | चेष्टविणे (२८१७) |
| पोट | पोटाळणे (३८०२) |
| डिंक | डिंकणे (४५०५) |



## तत्सम व तद्भव शब्दांचे प्रमाण

गाथ्यामध्ये तत्सम शब्द किती आणि तद्भव शब्द किती याविषयी काही अनुमान काढावे, याकरिता आम्ही तीन खंडांतील दहा अभंगांची या दृष्टीने पाहणी केली. त्यावरून आमच्या असे लक्षात आले की, या दहा अभंगांमध्ये एकूण तत्सम शब्द ९४ आहेत तर तद्भव शब्द २०६ आहेत. म्हणजे सामान्यतः गाथ्यातील तत्सम शब्दांचे प्रमाण शेकडा ३१ आणि तद्भव शब्दांचे प्रमाण शेकडा ६९ पडते, ही शलकापरीक्षा असली तरी एकंदर गाथ्यातील तत्सम व तद्भव शब्दांचे प्रमाण साधारणपणे याच सुमाराचे राहिले. फरक पडलाच तर फार अल्प प्रमाणात पडेल.

## फारसी अरबी शब्द

मराठी भाषेत फारसी व अरबी शब्द एकंदर किती आहेत आणि ते कोणकोणते आहेत, याचा विचार डॉ० माधवराव पटवर्धन आणि डॉ० यू० म० पठाण यांनी केलेला आहे. इतिहासाचार्य राजवाडे यांनी शब्दांची उदाहरणे न देता मराठी भाषेवरील फारसीचा क्रमाक्रमाने बदलत गेलेला प्रभाव आणि त्याची कारणे याचा सविस्तर विचार आपल्या ऐतिहासिक प्रस्तावना या खंडात केलेला आहे. राजवाड्यांनी इ० स० १६२८, १६७७ आणि १७२८ या तीन वर्षांतील एकेका गद्य पत्राच्या आधारे मराठी शब्दांचे शेकडा प्रमाण कसे वाढत गेले, त्याची आकडेवारी दिलेली आहे. त्यांच्या मते अनुक्रमे शेकडा १४, ६२, ९३ अशी वाढ होत गेली आहे. संत तुकारामांचे निर्याण इ० स० १६४९ मध्ये झाले म्हणजे राजवाड्यांनी दिलेल्या १६७७ मधील पत्रांच्या जवळपास तुकारामांच्या निर्याणाचा काळ येतो. या कोशाच्या शेवटी जी परिशिष्टे दिलेली आहेत त्यांतील एका परिशिष्टात तुकारामांच्या गाथ्यात आढळलेल्या अरबी-फारशी शब्दांची एकूण संख्या १६४ अशी आहे आणि गाथ्यातील एकूण शब्दांची संख्या जवळजवळ नऊ हजार अ[illegible] अरबी-फारशी शब्दांचे प्रमाण फक्त शेकडा २ टक्के इतके अल्प [illegible] मधील पत्रामध्ये मराठी शब्दांचे शेकडा प्रमाण ६२% इतके आहे.

यमकरचनेविषयी तुकारामांचा कटाक्ष असल्याने यमक साधण्यासाठी त्यांनी शब्दांची अनेक ठिकाणी तोडमोड केलेली आहे. अशी काही उदाहरणे पुढे दिलेली आहेत.

| मूळ रचना | हवी असलेली रचना |
|---|---|
| १) गोपी लाविला चंदन (१४९३) | लाविला गोपी चंदना |
| २) वसुदेव देवकीची बंद फोडुनी शाळा। (१५७६) | वसुदेव देवकीची फोडुनी बंद शाळा |
| ३) तुका म्हणे त्याचा संग नको शब्द स्पर्शअंग। (१७६७) | अंगस्पर्श |
| ४) सहित लेकुरे राहों सुखे। (१९८४) | लेकुरेसहित राहो सुखे। |
| ५) ओवाळूनि नामा तुझ्या वरूनि टाकिलो। (२२४६) | तुझ्या नामावरून ओवाळूनि टाकिलो। |
| ६) प्रेम आता पाजी रस। (२८१३) | प्रेम रस आता पाजी। |

## शब्दघटकांची उलटापालट

काही वेळा तुकाराम सामासिक शब्दांचा जो रूढ क्रम असतो त्याची रचनेच्या सोईसाठी उलटापालट करताना दिसतात. उदा०

| तुकारामकृत शब्द | योग्य शब्द |
|---|---|
| १) सहस्रसोळा (१११२) | सोळा सहस्र. |
| २) योगभाग्ये (१४११) | भाग्ययोगे. |
| ३) मंडित चतुर्भुजा (१५७५) | चतुर्भुजामंडित. |
| ४) अस्तउदयाची (२०११) | उदयास्ताची. |
| ५) वाईटबरे (३५४०) | बरे वाईट. |
| ६) वृत्तितमा (३७०६) | तमोवृत्ति. |
| ७) पुण्यपाप (४१३९) | पापपुण्य. |

## नामधातू

भाषेत 'नाम' म्हणून समजल्या जाणाऱ्या शब्दांचा क्रियापदासारखा वापर करणे ही लकब मराठी भाषेच्या इतिहासात सर्वच काळात प्रचलित असलेली दिसते. तुकारामांनीही असे अनेक नामधातू वापरले आहेत.

| नाम | नामधातू |
|---|---|
| लुब्ध | लुब्धणे (१८९) |
| हुशार | हुशारणे (१९०) |
| वमन | वमिणे (८१४) |
| होम | होमणे (१२१०) |
| ज्वर | ज्वरणे (२१६५) |
| हुताशन | हुताशणे (२६७०) |
| गोड | गोडावणे (२६८५) |
| चेष्टा | चेष्टविणे (२८१७) |
| पोट | पोटाळणे (३८०२) |
| डिंक | डिंकणे (४५०५) |



## तत्सम व तद्भव शब्दांचे प्रमाण

गाथ्यामध्ये तत्सम शब्द किती आणि तद्भव शब्द किती याविषयी काही अनुमान काढावे, याकरिता आम्ही तीन खंडांतील दहा अभंगांची या दृष्टीने पाहणी केली. त्यावरून आमच्या असे लक्षात आले की, या दहा अभंगांमध्ये एकूण तत्सम शब्द ९४ आहेत तर तद्भव शब्द २०६ आहेत. म्हणजे सामान्यतः गाथ्यातील तत्सम शब्दांचे प्रमाण शेकडा ३१ आणि तद्भव शब्दांचे प्रमाण शेकडा ६९ पडते, ही शलकापरीक्षा असली तरी एकंदर गाथ्यातील तत्सम व तद्भव शब्दांचे प्रमाण साधारणपणे याच सुमाराचे राहिले. फरक पडलाच तर फार अल्प प्रमाणात पडेल.

## फारसी अरबी शब्द

मराठी भाषेत फारसी व अरबी शब्द एकंदर किती आहेत आणि ते कोणकोणते आहेत, याचा विचार डॉ० माधवराव पटवर्धन आणि डॉ० यू० म० पठाण यांनी केलेला आहे. इतिहासाचार्य राजवाडे यांनी शब्दांची उदाहरणे न देता मराठी भाषेवरील फारसीचा क्रमाक्रमाने बदलत गेलेला प्रभाव आणि त्याची कारणे याचा सविस्तर विचार आपल्या ऐतिहासिक प्रस्तावना या खंडात केलेला आहे. राजवाड्यांनी इ० स० १६२८, १६७७ आणि १७२८ या तीन वर्षांतील एकेका गद्य पत्राच्या आधारे मराठी शब्दांचे शेकडा प्रमाण कसे वाढत गेले, त्याची आकडेवारी दिलेली आहे. त्यांच्या मते अनुक्रमे शेकडा १४, ६२, ९३ अशी वाढ होत गेली आहे. संत तुकारामांचे निर्याण इ० स० १६४९ मध्ये झाले म्हणजे राजवाड्यांनी दिलेल्या १६७७ मधील पत्रांच्या जवळपास तुकारामांच्या निर्याणाचा काळ येतो. या कोशाच्या शेवटी जी परिशिष्टे दिलेली आहेत त्यांतील एका परिशिष्टात तुकारामांच्या गाथ्यात आढळलेल्या अरबी-फारशी शब्दांची एकूण संख्या १६४ अशी आहे आणि गाथ्यातील एकूण शब्दांची संख्या जवळजवळ नऊ हजार आहे. म्हणजे गाथ्यातील अरबी-फारशी शब्दांचे प्रमाण फक्त शेकडा २ टक्के इतके अल्प आहे. इ० स० १६७७ मधील पत्रामध्ये मराठी शब्दांचे शेकडा प्रमाण ६२% इतके आहे. शिवकालापर्यंत फारसी

शब्दांचा प्रभाव सारखा वाढत होता त्याला पायबंद घालण्याचे काम मध्ययुगातील मराठी ग्रंथकारांनी केले असे जे विधान पुढे राजवाड्यांनी केले त्याचा प्रत्यय गाथ्यांतील फारसी अरबी शब्दांच्या अत्यल्प प्रमाणावरून दिसून येतो.

आतापर्यंत तुकारामांच्या शब्दसंग्रहाचे काही विशेष निवेदन केले. प्रारंभीच नमूद केल्याप्रमाणे तुकारामांच्या अभंगांचा सहज अर्थ लावणे अधिकारी पुरुषांनाही अवघड वाटते. त्यामुळे आम्ही केलेल्या अर्थासंबधी मतभेद होणे अगदी शक्य आहे. अन्य सार्थ गाथे, गाथ्याला जोडलेले शब्दकोश आणि महाराष्ट्र शब्दकोश या सर्वांचा या कोशनिर्मितीत मोठा वाटा असून त्यांचा भरपूर उपयोग झाला. त्याबद्दल या सर्वच संपादकांच्या विषयी आम्ही कृतज्ञता व्यक्त करतो. यातूनही काही त्रुटी राहून गेल्या असतील असे वाटते. अभ्यासकांनी त्या आमच्या नजरेला आणून दिल्या तर त्याचा चांगला उपयोग आम्हांला होईल असे वाटते.

## संदर्भ


१) तुकाराम महाराजांची गाथा – संपा० मा० कृ० देशमुख व शं० वा० दांडेकर, प्रस्तावना, पृ. १.
२) संत तुकारामांचा अभ्यास – गीता आणि गाथा – ले० रा० शं० नगरकर – पैलतीर, दिवाळी वार्षिक – १९९७.
३) फार्शी-मराठी कोश – डॉ० मा० त्र्यं० पटवर्धन – इ० स० १९२५.
४) मराठी बखरीतील फारसीचे स्वरूप – डॉ० यू० म० पठाण – इ० स० १९७३.
५) ऐतिहासिक प्रस्तावना – ले० वि० का० राजवाडे – इ० स० १९२८.


## शब्दसंक्षेप आणि मुद्राक्षर-प्रकार-व्यवस्था

| | | |
|---|---|---|
| अ. = अव्यय | भा.ना. = भाववाचक नाम | सा.श. = सामासिक शब्द |
| क्रि. = क्रियापद | वा.प्र. = वाक्प्रचार | सं.वि. = संख्याविशेषण |
| क्रि.वि. = क्रियाविशेषण | वि. = विशेषण | संबो. = संबोधन |
| न. = नपुंसकलिंगी नाम | वि.ना. = विशेषनाम | स्त्री. = स्त्रीलिंगी नाम |
| पु. = पुंल्लिंगी नाम | स.ना. = सर्वनाम | |

मुद्राक्षरांचे चार प्रकार वापरले आहेत.

अतिजाड अक्षर = **मूळ शब्द**

मध्यमजाड अक्षर = मूळ वा साधित शब्दाचा अर्थ

मध्यमजाड उभट अक्षर = वाक्प्रचार

साधे पातळ अक्षर = १) गोल कंसात शब्दव्याकरणाचा संक्षेप, २) अभंगांतील शब्द, ३) वाक्प्रचारांचे अर्थ

संख्या = १) श्रीतुकारामगाथा सरकारी प्रतीतील संदर्भात्मक अभंगाचा क्रमांक, २) मूळ शब्दाचे विविध अर्थ (संख्येपुढे गोल कंस)

॥ श्रीविठ्ठल ॥

# श्रीतुकाराम-गाथा–शब्दार्थसंदर्भकोश

## अ

**अंक**– (पु.) १) आकडा २०४२;
२) मुद्रा ३३९५.

**अंकित**– (वि.) १) बांधलेला, गुंतलेला ६४८, १४८३; अंकिते ७०३; अंकिताचा १०३२; अंकिला ११३५, २१०२, ३४४८; अंकिले २१५२; अंकितासी १५२१; अंकिलेपणे ६४४;
२) भक्त ५२१, १२२२;
३) सेवक १०४८;
४) स्वाधीन ८८९; अंखिली – स्वाधीन २१३०.

**अंकुर**– (पु.) कोंभ ५४१, ३७३२.

**अंकुश**– (पु.) हत्तीला टोचायचे हत्यार १२८२, १५४१.

**अंखणे**– (क्रि.) अंकित होऊन बसणे; अंखुनिया १७३८.

**अंग, आंग**– (न.) १) शरीर २९; अंगी ३६; अंगा ६०, १७७९; अंगे १२३५; आंगासी ४३५४;
२) खरा ५०, ८२५;
३) धर्माच्या ठिकाणी ९३;
४) मन; अंगी ११०, १४६५;
५) भाग, अवयव; अंग २८०;
६) बाह्यांग; अंगाचेच ३३७;
७) स्वतः; अंग १२७५; अंगाच्या १२६६;
८) मार्ग; अंगे १७२६;
९) सामर्थ्य; अंगे २४६२;
(वा. प्र.) अंगा येणे – प्राप्त होणे ९३, ८२९; अंग मोडणे – हावभाव करणे, अंगविक्षेप करणे १९२; अंग घालणे – जमिनीवर लोळण घेणे १९७; अंग चोरणे – चुकारपणा करणे १९८, २८११; अंगी मिळोनी जाणे – मिसळून जाणे २२७; अंगी जडणे – अंगचटीला येणे ३८०, ९९६; अंग लपविणे – अंग चोरणे ३९४; अंगे हरपणे – स्वतःला विसरणे ३९८; अंगी भरणे – शरीरात शिरणे – ४१४; अंगा येणे – अंगात येणे ४१७; अंगी खेळणे – अंगात येणे ४२२; अंग मळणे – अंगाला फासणे ४४८; अंगी भरणे – शरीर व्यापून जाणे ५८०; अंग हलविणे – नर्तन करणे ६१०; अंगे कापणे – अंग थरथरणे, करवतीने शरीर कापणे ६२३; अंगा भोग येणे – भोग प्राप्त होणे ७१९; अंग धरणे – भावना स्थिर राहणे ७२०; अंगात आणणे – (भुते) आल्याचे दाखविणे ७७६; अंग लोटणे – अंग टाकणे ७८७; अंगे अंग मिळविणे – पोटाशी घट्ट धरणे ८३१; अंगी खेळणे – शरीरात वास्तव्य करणे ८६९; अंग देणे – मनोभावे सेवा करणे ८९१; अंगी भरणे – शरीरात मुरणे ९६४; अंगा अंगी जडणे – अंगाला भिडणे ९७१; अंगे होणे – स्वतः होणे १२०४; अंगावर येणे – स्वतःवर ओढविणे १२३१; अंगा येणे – मरण येणे १५६२; अंग राखणे – हात राखून काम करणे २०४३; अंग कापणे – शरीराला पीडा होणे ३७४३; अंगा जडणे – एकरूप होणे ४१८८; अंगात वारे घेणे – देवतेचा संचार होणे ४२७६.

**अंगकांती**– (स्त्री.) शरीराचे तेज ४४६१.

**अंगपण**– (न.) सामर्थ्य ४४२२.

**अंगबळे**– (न.) स्वसामर्थ्याने ३०८१.

**अंगभूत**– (वि.) १) स्वतःची १८५२, २२०२;
२) सामावलेले ३९५१.

**अंगभिन्न**– (न.) शरीरापासून दूर ६४१.

**अंगलग**– (वि.) जवळचे ११०१.

**अंगलगा**– भेटीपासून २९५३.

**अंगसंग**– (पु.) १) शारीरमीलन ९, १५;
२) लडिवाळपणा १०२९.

**अंगक्षोभ**– (पु.) शरीरदाह १३१७.

**अंगण**– (न.) घरापुढची मोकळी जागा; अंगण ५३२, २८३३; अंगणी ६८४, १६६८, २१५२.

**अंगणा**– (स्त्री.) स्त्री २४८७.

**अंगराख्या**– (पु.) अंग चोरून काम करणारा २८१४.

**अंगारा**– (पु.) भस्म २०२४, ४२७६.

**अंगिकार**– (पु.) स्वीकार

**अंगीकारणे**– (क्रि.) स्व
१७६०; अंगीकारा ५०१;

**अंगुले**– (न.) आंगठी १८

**अंगुष्ट**– (पु.) आंगठा; अंगु

**अंगुळी–** (स्त्री.) **करंगळी** ; अंगुळी ७८१, ३३९४; अंगोळिया १७५८.

**अंगेजणे–** (क्रि.) **आपलेसे करणे**; अंगेजिसी ३४६५.

**अंघोळ, आंघोळ–** (स्त्री.) **स्नान**; अंघोळी १४६६, ४१२८; आंघोळ ६७७; आंघोळी १२११, ३३६४.

**अंजन–** (न.) **डोळ्यांत घालण्याचे औषधी द्रव्य** ४२५;
(वा. प्र.) **अंजन लेणे** – डोळ्यांत अंजन घालणे ८९६.

**अंजनगुण–** (पु.) **अंजनाचा परिणाम; अंजनगुणे** – अंजनाच्या परिणामाने ४३१३.

**अंजनी–** (वि. ना.) **हनुमंताची आई**; अंजनीचिया २८३.

**अंजुळ–** (स्त्री.) **ओंजळ** २४३२, ३४३६.

**अंड–** (न.) **वृषण** ७७, ४४६१; अंडे – **ब्रह्मांड**.

**अंत–** (पु.) १) **शेवट** ३१, ८२९, १४७२;
२) **मरण** – अंती ३१;
३) **परिणाम** – अंती ७१;
४) **मूळ** – अंत ८७५;
५) **कसोटी** – अंत ३७२८;
(वा. प्र.) **अंत पाहणे** – सत्व पाहणे ३१, २२४१.

**अंतकाळ–** (पु.) **मरणकाळ**; अंतकाळी ८६, १७२७; अंतकाळीचा २२५३; अंतकाळीचे ९३९.

**अंतपार–** (पु.) **सीमा, मर्यादा** ३६२, १७३३, २५५३.

**अंतर–** (न.) १) **दोन ठिकाणांतील किंवा व्यक्तीं-मधील अंतर** ३९५;
२) **दूर** – अंतर १३०६;
३) **दुरावा** – अंतर १६५२;
४) **अंतःकरण** – अंतर १८, १२५८, २९८७; अंतरा ११२, ३८४; अंतरी ५५, ६१८, १३७५; अंतरीचे ६७, १२९८;
५) **फरक** – अंतर २४२;
६) **खंड** – अंतर – ६६१;
(वा. प्र.) **अंतरा येणे** – अंतःकरणात निवास करणे ९५३.

**अंतरबाहे–** (क्रि. वि.) **आत बाहेर** १११३, १८७०; अंतरबाही – (क्रि. वि.) **आत बाहेर** १२०८, २०००; अंतरबाह्यात्कारी – (क्रि. वि.) **आत बाहेर** ९१, ४५४५; अंतरवासे – (पु.) **अंतःकरणात निवास केल्याने** ९७९; अंतरव्यापी – (वि.) **अंतःकरण व्यापणारा** १६११.

**अंतर(णे)–** (क्रि.) १) **दूर जाणे, मुकणे**; अंतरे ९३, १२०८; अंतरसी ६२८, ८९८; अंतरती ८५९; अंतरलो १४८, ४६२, १७६६; अंतरला ५६६; अंतरली २१९; अंतरले ८८५; अंतरल्या ४३८९;
२) **संपणे** – अंतरला ३८५.

**अंतरध्यान–** (न.) **मनाने ध्यान करणारा** २३६६.

**अंतरपाट–** (पु.) **वधू–वरांमधील पडदा** २४८३.

**अंतराय–** (पु.) १) **अडथळा, विघ्न** १०८;
२) **अंतर** २४२.

**अंतरिक्ष–** (न.) **आकाश**; अंतरिक्षीं १३३९.

**अंतर्याम–** (न.) **अंतःकरण**; अंतर्यामी ४४८२.

**अंतुरी–** (स्त्री.) **पत्नी** २५००, ३९९१.

**अंत्यज–** (वि.) **शूद्र**; अंत्यज ११८, १२३५; अंत्यजाचा १२३४; अंत्यजादी ४२९९.

**अंत्यजता–** (भा. ना.) **शूद्रपणा** २१८१.

**अंथरुण–** (न.) **शय्या** ४२८.

**अंदण, आंदण–** (न.) १) **दान**; अंदणी ६४४; अंदण ३९८५; आंदण १२२; आंदणी ६१६; आंदणे ४०४४; आंदणिया ४२११;
२) **अंकित** – आंदणा १५००.

**अंध, अंधळा, आंधळा–** (वि.) १) **नेत्रहीन**; अंध ३७७, १३८९; अंधा १९९९; अंधु ४०४१; अंधापुढे ८१९;
२) **अंधळे** १३९५, १९९०; अंधळ्यास ८३५; अंधळ्याचे १४७९; अंधळ्याची १७८०; अंधळिया ४३०८; अंधळिया-करीं (अंधळ्याच्या हातातील) २७९५;
३) **आंधळे** १३१, ५५०; आंधळ्यासि १९१, ४१४; आंधळ्या पांगळ्यांचा ४२७; २. **ज्ञानहीन** – आंधळी ८९२.

**अंधकार–** (पु.) **काळोख**; अंधकार २९०, ४१४; अंधकारापुढे; अंधारात ३३६१.

**अंधार–** (पु.) १) **काळोख** ४२५, ७२६; अंधारा ८८०, १३९१; अंधारे;
२) **अज्ञान**; अंधाराने १३९४.

**अंधारणे–** (क्रि.) १) **अंधारात चाचपडणे**; अंधारली १६५३;
२) **अंधार करणे** – अंधारून २८०९.

**अंबऋषी–आंबऋषी–** (वि. ना.) **एक ऋषी**; अंबऋषी २२८५; अंबऋषीकारणे १५००; आंबऋषी १५५७, १७६५; आंबऋषीचे २८२०; आंबऋषीकारणे १७८४.

**अंबर–** (न.) **आकाश**; अंबर १८९, ३८२१; अंबरी ३३१, ४३१७.

**अंबा–** (वि. ना.) **एक देवता**; अंबेचा ४०३२.



**अइकणे, आइकणे–** (क्रि.) **ऐकणे; श्रवण करणे**; अइकावे २१; अइका ८०७; अइके २०९; अइकता ३४२; आइकाल २६; आइका ३०; आइकतो ५५१; आइकोनि ५७८; आइको ९१६; आइकत ९७५.

**अकरालक्ष–** (सं. वि.) **एक संख्या**; अकरा लक्ष ४४४३.

**अकर्तव्य–** (न.) १) **न करायच्या गोष्टी** ३११, २१९९;
२) **करण्याजोगे काही न उरणे** १३६५.

**अकर्ता–** (वि.) १) **काही न करणारा** ५३५;
२) **सर्व करूनही न करणारा** ६७३.

**अकर्म–** (न.) **वाईट कर्म** ९१५.

**अकस्मात–** (क्रि. वि.) **अचानक** २५५०.

**अकळ–** (वि.) **न कळणारा** १३९०, २४२५.

**अकांत, आकांत–** (पु.) १) **संकट, आपत्ती**; अकांती १७६५, ३२९६; आकांत ५५७, २७१९.
२) **आक्रोश** – आकांत २२४५.

**अकाल–** (पु.) **अशुभकाळ**; अकाळी ६४१, २७२७.

**अकुळी–** (वि.) **चांगल्या कुळातील नसलेला** १८६६.

**अक्रूर–** (वि. ना.) **कृष्णभक्त** ६,४९३, १७६५.

**अखंड–** (वि.) १) **सतत, नेहमी**; अखंड ३६, १०७६, १४७८; अखंडचि १३२६, अखंडित ६८, ५४९, १३९३;
२) **चिरंजीवी** ६९३, १०५१; अखंडकर्मा – (वि.) **सतत काम करणारा** ६७४; अखंडस्वरूपा – (वि.) ६७३; अखंडप्रीति – (स्त्री.) ४२२४;
३) **अथांग** – अखंडक्षीराब्धी – (पु.) **अथांग समुद्र** ६७२.

**अखई–** (वि.) **अखंड, सतत** ४४९.

**अखम–** (वि.) **असमर्थ**; अखमाचा ४२३.

**अखिल–** (वि.) **सर्व**; अखिल अंतरंगा ६७५.

**अखेर–** (स्त्री.) **शेवट** १२७.

**अगणित–** (वि.) **असंख्य** १५१२, २४७७.

**अगत्य–** (न.) **प्रेम** १३५४, ३९८५.

**अगम्य–** (वि.) **न समजणारे**; अगम्य १३६३, २४७७; अगम्यस्थिती (स्त्री.) ६७५.

**अगर–** (पु.) १) **शेंडा**; अगरी ११४४;
२) **खाण**; अगर १०२९.

**अगरी–** (वि.) **अग्र, टोक** १७५२.

**अगस्ति–** (वि. ना.) **एक ऋषी**; अगस्तिब्राह्मणा २७८३.

**अगळ्या–** (वि.) **अधिक** २२७.

**अगा, आगा–** (संबो.) **अगा** ६१६, ४४२३; आगा ४५, ५०१.

**अगाद, अगाध–** (वि.) **अमर्याद**; अगाद १५८०; अगाध १३०१.

**अगी, आगी–** (स्त्री.) **अग्नी, आग**; अगी १८४७, ३४९४; अगीविण १३०५; अगीपाशी २७४७; आगी २०३, २११६; आगीपासूनि २०५; आगीतूनि ५४६; आगीजोगे ५८३;
(वा. प्र.) **आगी लागणे** – नाहीसे होणे, जळणे ६२८, २२९६.

**अगुण–** (वि.) १) **गुणातीत** (देव) अगुणाची २२,
२) **खोडकर** – अगुणा – १६६.

**अगोचर–** (वि.) **न दिसणारा** ६२७, ४५२७.

**अग्न, अग्नी–** (पु.) **विस्तव**; अग्न ३७२, १९८०; अग्नी ५२३, १११२, १५२६; अग्नीसी ३१९; अग्नीचा ७७५; अग्नीत १०२३; अग्नीचिया ११४०; अग्नीमाजी १४९२; अग्नीस्तंभ ६२३, ८०५; अग्निज्वाळा १७५१; अग्निकर्पूराच्या २४८४; अग्निकुंडामाजी ३०९४; अग्निरूप ३०९४.

**अग्रपूजा–** (स्त्री.) **यज्ञप्रसंगी थोर व्यक्तीची प्रथम होणारी पूजा**; अग्रपूजेचा ४२५७.

**अघटित–** (वि.) **असंभाव्य**; ५६३, ३६५०.

**अघोर–** (वि.) **भयंकर** १२२, ११३७, ३०५५.

**अघोरा–** (वि.) **भयंकर** ६२३.

**अघोरिया–** (ना.) ३०६.

**अघोरी–** (वि.) ४२११.

**अचळ–** (पु.) **पदर** ३७८; अचळ ९६४, १४२३; अचळी १३६३; अचळपदी (न.) ४३४३.

**अचिंत–** (वि.) **निश्चिंत** ९५४.

**अचेत–** (वि.) **चैतन्यरहित**; अचेत ७०४; आचेत ४१३९.

**अच्युत–** (वि.ना.) **विष्णू**; अच्युत १५४५; अच्युता १३००; अच्युताच्या ३१४०.

**अज–** (वि.) **अनादि** ४४३१.

**अजगर–** (न.) **सापाची एक जात** ६०२, ४४३३.

**अजापुत्र–** (पु.) **बोकड** ४३५१.

**अजामेळ–** (वि.ना.) **कान्यकुब्ज देशातील मूळचा दुराचारी पण नामस्मरणाने उद्धरून गेलेला ब्राह्मण** २५७, १२०८, १७२७;

**अजून, आझून–** (क्रि. वि.) **अद्यापपर्यंत**; अजोनी ४०५३; अझुणी १७४; अझूनी २२७, ८९७; आझुन

(वा.प्र.) **उद्धार देणे** – शब्द देणे ४५९.

**उद्देश**– (पु.) हेतू; उद्देशाची ६६३; उद्देशो १५४२; उदेश २२२३.

**उद्देशिणे**– (क्रि.) हेतू बाळगणे २२२३.

**उद्धत**– (वि.) **उद्धट**; उद्धति ३५४२.

**उद्धरणे**– (क्रि.) **उद्धार करणे**; उद्धरिता ६६३; उद्धरिले ९४५, १२०८; उद्धरिला १२४९; उद्धरती १५७१; उद्धरणे – (न.) **उद्धार कार्य** ३६७१.

**उद्धव**– (वि.ना.) **एक कृष्ण भक्त** ६, ४९३, ४१५६.

**उद्धार**– (पु.) **उद्धार** ६१९, ११४३, १५७२; उद्धाराचा ८७०; उद्धारासी २५४०;

(वा.प्र.) **उद्धार पावविणे** – उद्धार करणे ६३८.

**उद्भट**– (वि.) **कठीण** १०५१.

**उद्या**– (क्रि.वि.) **उद्या**; उद्यां १२७; उद्यांचे ४४८६.

**उद्योग**– (पु.) **स्वीकृत काम**; उद्योगाचा २१४; उद्योगहेलकावे ४१८७.

**उद्वेग**– (पु.) १) **त्रासणे, नाराजी** ८८८, १२७६, ३७४५; उद्वेगाची २५१७; उद्वेगाचे ३१८२;

२) **तळमळ**; उद्वेग ९९९;

३) **इच्छा**; उद्वेग ३६२४.

**उद्वेगणे**– (क्रि.) **त्रासणे, दुःखी होणे**; उद्वेगले ६३९; उद्वेगला २३९५.

**उधळणे**– (क्रि.) **वर उडविणे**; उधळिता ५६३.

**उधान**– (न.) **उसळी**; उधानु ४३६२.

**उधार**– (वि.) **बिन रोखीचा व्यवहार** ३३१; उधारा १००९; उधाराचा २३२४; उधाराचे ४०६६.

**उन**– (वि.) **गरम** ३३११.

**उन्मत्त**– (वि.) **माजलेला** २६४.

**उन्मन**– (न.) **ब्रह्मरूप** १४७२, ४३३०; उन्मनति, अलौकिक १५८२; उन्मनीचा १७८९.

**उन्मळणे**– (क्रि.) **अर्धवट उघडणे**; उन्मळोनि १४९२; उन्मळी ४५१९.

**उन्हवणी**– (स्त्री.) **गरम पाणी** १७५८.

**उन्हाळा**– (पु.) **उन्हाळा** २३०९.

**उपकरण**– (न.) **पूजेचे साधन**; उपकरणे – **देवपूजेची भांडी** १२५.

**उपकार**– (पु.) **मदत, सहाय** १७८, ५३८, १०२५, १३३३; उपकाराची ४२६; उपकारासाठी ९४८; उपकारापुरता ९९३; उपकारस्मरण (न.) २९४६;

(वा.प्र.) **उपकाराने बांधणे** – ऋणी करणे २७६८.

**उपक्रम**– (पु.) **प्रारंभ**; उपक्रमे १३०३, २४४३.

**उपचार**– (पु.) १) **उपाय, इलाज** ६३, ५०१, २०६८; उपचारा १२९१; उपचारे १३९८;

२) **शीतलोपचार**; उपचार ३८४;

३) **मार्ग**, उपदेश; उपचार ११३७;

४) **कृत्य**; उपचाराचे १४०३;

५) **सोपस्कार**; उपचार १४५१; उपचार दुःखे (न.) १६३७; उपचार मिष्टान्ने – (न.) **मिष्टान्न-भोजन** ४५२१.

**उपचारिले**– (क्रि.) **माखणे**; उपचारिले ३२७०.

**उपजणे**– (क्रि.) १) **निर्माण होणे**; उपजली १२०; उपजोनि ३३२; उपजे ६६४; उपजला ३६८; उपजावया ६०४; उपजता ६५१; उपजविती १२५७; उपनोचि १३०४; उपजलासी ३८८९;

२) **जन्मणे**; उपजोनिया १६१; उपजता ९९८; उपजवा ४१८९.

**उपटणे**– (क्रि.) **उपटून काढणे**; उंपटी ३३९, २९५८.

**उपडणे**– (क्रि.) **उपटणे**; उपडोनी २५५; उपडूनिया ३८८; उपडितां ३७४३; उपडिले ४२७१.

**उपणणे**– (क्रि.) **पाखडणे**; उपणूक २२२५.

**उपतिष्ठणे**– (क्रि.) १) **उगवणे**; उपतिष्ठे ३०५५;

२) **प्राप्त होणे**; उपतिष्ठे ४३६४.

**उपदेश**– (पु.) **मार्गदर्शन, शिकवण** ७६, ७९०, १३६१; उपदेशी (वि.) २५९; उपदेशा २८१; उपदेशहीन – (वि.) **उपदेशाला अपात्र** ३७९५.

**उपदेशणे**– (क्रि.) **शिकवणे, बोधकरणे, उपदेशू** ४५६; उपदेशिला १७२८.

**उपनाव**– (न.) **अन्य नाव, दुसरे नाव**; उपनावे २४२७.

**उपमन्यसाहाकार**– (वि.) **उपमन्यूला साह्य करणारा**; उपमन्यसाहाकारा ४४२३.

**उपमन्यु**– (वि.ना.) **धौम्यऋषीचा शिष्य** ४२७; उपमन्याकारणे १७८४.

**उपमा**– (स्त्री.) **दोन वस्तूंमधील सारखेपणा दाखविणारा शब्दालंकार** ११३, १५८०; उपमेसी १०९४.

**उपयोग**– (पु.) **हितकारक, उपयुक्त**; उपयोगी १२१, ३५१४.

**उपर**– (क्रि.वि.) **वर** ३७१८.

**उपरति**– (स्त्री.) **पश्चात्ताप** ४३२८.

**उपरम**– (पु.) **वैराग्य** ४१३२.

**उपरोध**– (पु.) **दुरावा** ३७२२.

**उपवास**– (पु.) १) **लंघन** १५७२;

२) **उपाशी**; उपवासी १०४;

३) **उपवास करणारा, उपवासी** १०९६;



(वा.प्र.) **उपवासी बसणे** – उपोषणाला बसणे ४२६६.

**उपसणे**– (क्रि.) **करणे**; उपसता १७६९.

**उपसर्ग**– (पु.) **त्रास, उपद्रव** ४५९७.

**उपस्थ**– (न.) **पुरुषलिंग** ४४८.

**उपस्थित**– (वि.) **निर्माण झालेले** ३२३३.

**उपहास**– (पु.) **निंदा, अवहेलना** १३११, ३५८२.

**उपाधी**– (स्त्री.) **संसाराचे बंधन** १८०५; उपाधीच्या ८०, १४२१; उपाधीचा १४०५; उपाधीचे २२०१; उपाधिवेगळा १३०७;

२) **संसर्ग**; उपाधि ५६४;

३) **कारण**; उपाधी ७९०;

४) **कर्मकांड**; उपाधी १२९८;

५) **उपद्रव**; उपाध १४९४; उपाधिडाई; २१ उपाधि–पसारा (पु.) २९२०; उपाधिवचन (न.) ३४०६; उपाधिवोळसा – (पु.) **संसारबंधनाचा विळखा** ३७०१.

**उपाय**– (पु.) **अन्य साधन** १०८, ८६८, १३३०; उपायाची ८३७; उपायी ८८८; उपाया १३४४.

**उपार्जना**– (स्त्री.) **प्राप्ती, लाभ** ५५०.

**उपार्जिणे**– (क्रि.) **प्रा!प्त करणे, मिळविणे**; उपार्जिती ६७.

**उपाव**– (पु.) **उपाय** ९६, ६४७, १४१६.

**उपास**– (पु.) **लंघन** १००; उपासाशेवटी, उपवासानंतर २६५६.

**उपासक**– (पु.) **उपासना करणारा** ७९४.

**उपासना**– (स्त्री.) **परमेश्वर साधना** ५६१, १३१६, ३८८२.

**उपेग**– (पु.) **उपयोग** ३३६४; उपेगाची २७०१.

**उपेक्षिणे**– (क्रि.) **दुर्लक्ष करणे**; उपेक्षीना ६०२, १८८८; उपेक्षिली १३३५; उपेक्षीजे १४१०; उपेक्षिला १४३७; उपेक्षू २४०५.

**उपेक्षीत**– (वि.) **दुर्लक्षित** २२१२.

**उफराटे**– (न.) **उलटे** ९३, २२२०; उफराट्या ७५१; उफराटी २२३३.

**उब**– (स्त्री.) **उकाडा** ५१२.

**उबग**– (पु.) **त्रास, वीट** ८२२.

**उबगणे**– (क्रि.) **त्रासणे, वीट येणे**; उबगला ३५०९; उबगोनि ३२९६; उबगता ३९९१.

**उबड**– (वि.) **निर्माण झालेले** ७९२.

**उबारा**– (पु.) **उकाडा** ३८४.

**उबाळा**– (पु.) **उमाळा**; उबाळ्याच्या ४३६२.

**उभड**– (पु.) **उमाळा** ४५४४.

**उभय**– (स.ना.) **दोघे**; उभयता २४२, ८३१, १४९१; उभयलोकी – (पु.) **इहलोक व परलोक** ७१८, १३६५; उभयकुल – (न.) **मातृकुल, पितृकुल** २४५७; उभयकुळी साक्ष – (स्त्री.) **मातृकुल व पितृकुल यांच्या साक्षीने** २२६५.

**उभविणे**– (क्रि.) **उभारणे, बांधणे**; उभविली २०४७.

**उभा, उभी, उभे**– (क्रि.वि.) १) **उभे राहिलेले**; उभा ५, ३७०, १३१७; उभी १११, ४८१; उभे २०८, १०४१; उभ्या ४०८, ५१५;

२) **सर्व**; उभ्या २४५१;

३) **लगोलग**; उभ्या २९६१; उभाउभी – (क्रि.वि.) **उभ्याने** १११, १५२; उभाउभी – (क्रि.वि.) **तत्काळ** १२७०;

(वा.प्र.) **उभे ठाकणे** – तद्रूप होणे १५८१; **उभे वारे सुटणे** – बेचैन होणे १९१३.

**उभारणे**– (क्रि.) **हात वर करणे**; उभारिला १३०, २८०६; उभारोनि ४४५, २२९९; उभारा ३६०१.

**उभारा**– (पु.) **देखावा**; उभाऱ्याने १२९०.

**उमगणे**– (क्रि.) **जाणणे, समजणे**; उमगूनी १२३३.

**उमज**– (पु.) **समज, ओळख** ३८९८.

**उमटणे**– (क्रि.) १) **प्रतिबिंबित होणे**; उमटले ३७८; उमटेना १३२६; उमटती १५९३; उमटे १७७१; उमटूनी २५२८;

२) **निर्माण होणे**; उमटला १९०; उमटेचि १२५२;

३) **वाटणे**; उमटे २६५;

४) **प्रगट होणे**; उमटे ८२४;

५) **वाजणे**; उमटे १७७२;

६) **सांगणे, प्रसिद्ध करणे**; उमटूनि २६६९;

७) **स्पष्ट दिसणे**; उमटोनि ३६८७.

**उमलणे**– (क्रि.) **स्पष्ट करणे**; उमलूनि ३१९७.

**उमा**– (वि.ना.) **पार्वती** ४२०५, ४३५९.

**उमान**– (न.) **उखाणा**; उमाने २३१४.

**उर**– (न.) १) **अंतःकरण** १३७६; उरी ३७७, ७६०;

२) **द्वैत**; उर १९९३;

३) **छाती**; उर ३०६३; उरा ३०६३;

(वा.प्र.) **उर कुटणे** – छाती बडवणे ४५४३; **उर फोडणे** – निरर्थक चर्चा करणे ९१७; आरडाओरड करणे ३२२४; कष्ट होणे ३७४१.

**उरणे**– (क्रि.) १) **शिल्लक राहणे**; उरला ४५, १२७६, २९०५; उरे ३२९, १४१४; उरो ३८६, ८७८; उरईल ६३१; उरलासी ६५९; उरल्या १३६९; उरावे १४२७; उरविला २०४२;

२) राहिलो; उरलो ९९३; उरती १०८४; उरउरीत – वेगळेपणाने २९०५.

**उरवरित**– (वि.) शिल्लक १२०९.

**उरी**– (क्रि.वि.) १) उरणे, शिल्लक ३२९, ४२१, १०८४;
२) अंतर; उरी १८५६;
३) थोडेही; उरी १९१९; उरीजोगी – उरण्याजोगे ९७०;
(वा.प्र.) उरी न ठेवणे – संपविणे १४३; उरी नसणे – मैत्री न उरणे ३८८; उरी न ठेवणे – भीडभाड न ठेवणे. ९५७; उरी ठेवणे – पर्वा करणे १६७५.

**उरी**– (स्त्री.) गोडवा २३२.

**उर्मी**– (स्त्री.) उद्रेक ३४९३.

**उर्वरीत**– (वि.) उरलेले २४४१.

**उर्वी**– (स्त्री.) पृथ्वी; उर्वीचे ३०६४.

**उलंघ**– (न.) मर्यादा सोडणे १५२२.

**उलंघिणे, उल्लंघिणे**– (क्रि.) १) मर्यादा पार करणे; उलंघिली ३३९; उलंघोनि १७७७; उलंघूनि २३३७; उलंघिचे ३१२४;
२) मर्यादा सोडणे; उलंघिली २०६५; उल्लंघिले ९७९; उल्लंघुनिया १२०८.

**उलंडणे**– (क्रि.) पालथा करणे; उलंडूनि ३७९.

**उल्लंघन**– (न.) मर्यादातिक्रम १३९४.

**उलट**– (क्रि.वि.) विरुद्ध;
(वा.प्र.) उलटिया देणे – एकमेकींच्या अंगावर पाणी उडविणे;

**उलथणे**– (क्रि.) उलटणे; उलथिशी ४३९२.

**उल्हास**– (पु.) आनंद १७५४, १९७५; उल्हासा ४३३०.

**उल्हासणे**– (क्रि.) आनंदित होणे; उल्हासे ९८०.

**उशीर, उसीर**– (पु.) वेळ लागणे; उशीर ५१२, १०२२, १९५५; उशिरा ५१२; उसीर ७१९, १६०३, ३६०९.

**उष्टावळी**– (स्त्री.) १) पत्रावळीवरील उष्टे अन्न ३८, १९९८, २८३३;
२) उसनवारी करून केलेले काव्य; उष्टावळी ७९.

**उष्टे**– (न.) १) पानात टाकलेले अन्न; उष्ट्या १६१७; उष्ट्यावरी ३६६७;
२) उसनवारी; उष्ट्या १२८४.

**उष्ण**– (वि.) उन्हाचा ताप ३६१, १२१०; उष्णे ९९७; उष्णजाळ – (पु.) प्रखर ज्वाळा ४२८; उष्णकाळमास – (पु.) वसंत ऋतू २३१०.

**उसंत**– (स्त्री.) सोपी २४४१.

**उसंतिणे**– (क्रि.) १) विश्रांती घेणे; उसंतिले २४९; उसंतितो १४२५;
२) सवड काढून केलेली वाटचाल; उसंतिली १३४९; उसंतितो २८२३; उसंतिल्या ३४८०.

**उसंती**– (स्त्री.) विश्रांती २१३४.

**उसणवारी**– (स्त्री.) परतीच्या बोलीने केलेला व्यवहार २५६.

**उसणे, उसने**– (न.) १) उसने, परतीच्या बोलीने केलेला व्यवहार; उसिणे १३६५; उसणे २४२५;
२) वरकरणी; उसणे ३७१५;
(वा.प्र.) उसने फेडणे – परत फेड करणे ३६९३; उसना १६८४.

**उसळणे**– (क्रि.) वेगाने वर येणे; उसळती ७०१.

**उसाळी**– (स्त्री.) वेगाने वर येणे १३५३.

**उसे**– (न.) डोक्याजवळ; उसा ४३५१.

## ऊ

**ऊ**– (स्त्री.) डोक्यातील कीटकवांच्या ५६.

**ऊत**– (पु.) १) अतिरेक २६६६;
२) फेस येणे; ऊत ४५५०.

**ऊन**– (न.) सूर्याचे उन्ह २५५०; उन्हे ५४०.

**ऊर**– (पु.) छाती ९९.

**ऊर्ध्व**– (क्रि.वि.) १) वर ३९६;
२) उन्नती; ऊर्ध्व २३५४; ऊर्ध्वमुखे (न.) ४२६; उर्ध्ववाहिनी – (स्त्री.) श्रेष्ठ पदाला नेणारी २३४३.

**ऊर्मी**– (स्त्री.) उद्रेक १०९.

**ऊस**– (पु.) ऊस ५७९, १८८०, ४२६९.

## ऋ

**ऋण**– (न.) १) कर्ज ९२, १७४९; ऋणाच्या ८२२; ऋणे १४२४;
२) सेवारूपी ऋण; ऋण १६५०; ऋणेपायी ८५७.

**ऋणकरी** – कर्जबाजारी १२२६.

**ऋणानुबंध**– (पु.) संबंध; ऋणानुबंधे ३२२०.

**ऋणी**– (वि.) उपकृत ११४५, १९७६; ऋणीया १५००.

**ऋषि**– (पु.) ज्ञानी, मुनी ६०९, ११०७, १९८८; ऋषिनेम – (पु.) वाल्मिकीने घालून दिलेला नियम १०९५; ऋषिपत्न्या (स्त्री.) १२०८,

**ऋषेश्वर**– (पु.) ४५०६; ऋषी.

**ऋद्धिसिद्धि**– (स्त्री.) संपत्ती, समृद्धी ५३१.



## ए

**ए**– (संबो.) ६१६.

**एकंकार**– (पु.) एकरूपता २०४०.

**एक**– (सं.वि.) १७; एका १७, ३८; एके ८५; एकचि १०८८; एकली ३९५, ३५०१; एक्या ४६०; एकट ५५६; एकिये ९९६; एकांच्या १२६४; एकी १३२६; एकल्या १७७२; एकाचे – दुसऱ्याचे १२४; एकीं – काहींनी १४४; एकसा – अखंड, १५९; एकुलते – एकच ३९१; एकाचिया ५४१; एक – एकसारखे ६६३; एकापुढे १४८; एकाकरिता १८९; एकावाचूनि २७७; एकाविणें ३०१; एकीपाशी ३७७; एकपणें – एकत्रित ४६१; एकीकडे ६७८; एकमय – एकरूप ८८४; एकावरी २२७०; एकाएकी – एकरूपता १८; एकाएक – एकमेकांना १४४; एकवटा – एकत्रित १४८; एकएकल्या – एकेकाला १८१; एकाएकीं – अचानक २७४; एकाकी ६४४; एकभाव – एकरूप ४९; एकवटा – एकत्रित १४८; एककशी – एकाच कसाचे १५७; एकामुखी – एकमेकांच्या मुखात २११; एकसरे – एकदम ३१५; एकाभावे – (पु.) अनन्यनिष्ठेने ३७७; एकवाटा – (स्त्री.) एकत्र ३७८; एकावेळा – (स्त्री.) थोड्या काळात ५००; एकभावदीप – (पु.) एकनिष्ठेचा दिवा, ५०४; एकसवा – (न.) एकरूप ५११; एकदेशी – (वि.) १. निश्चित ६९२; २. एकांगी ७५०; एकरासी – (स्त्री.) एकसारखा ८३२; एकदळ – (न.) एकपान १०३९; एकाबळे – (न.) सहाय्याने १४७६; एकछत्री – (न.) एका अधिकाराखाली १९७०; एकदेही (पु.) २३०१; एकचित्त – (वि.) एकाग्र २४५८; एकटवाणे – (न.) एकाकीपण ३१६२; एकनिष्ठ (वि.) ४१०७.

**एकत्रता**– (भा.न.) एकत्रीकरण ४४७६.

**एकदंत**– (वि.) गणपती; एकदंता ६०९.

**एकविध**– (वि.) १) एकनिष्ठ १५, १६२१;
२) अस्थिर; एकविध ९९८;
३) एकाग्र; एकविध ३६७३; एकविधभाव – (पु.) एकनिष्ठा २०११.

**एकवीरा**– (वि.ना.) देवी ४१७.

**एकवीस**– (सं.वि.) ३७५०.

**एकांगी**– (क्रि.वि.) एकतर्फी; एकांगीच ९५९.

**एकांत**– (पु.) १) निवांत स्थान १५, ८७१, ३०५३; एकांताचे १७४;
२) एकाग्र; एकांती ११२३;
३) एकटा; एकांती १२२४;

**एकांतवास**– (पु.) एकाकी राहणे ३८८५; एकांतवासी ९८६.

**एकांतसुख**– (न.) एकटे राहण्यातील सुख ३७९३.

**एकाजनार्दन**– (वि.ना.) एकनाथ; एकाजनार्दना १५६८.

**एकात्मक**– (वि.) एकरूप ४४७४.

**एकादश**– (सं.वि.) अकरा २३४७.

**एकादशी**– (स्त्री.) महिन्यातील शुद्ध वा वद्य अकरावी तिथी ४५०, १५७२, २८९१; एकादशीस ३१२; एकादशीव्रत (न.) ५९; एकादशीविध – (पु.) एकादशीचा आचार २६७०.

**एकावळी**– (स्त्री.) मोत्याचा हार ४०७२.

**एकासन**– (न.) एका आसनावर दुसऱ्याने बसणे; एकासनी २७४.

**एकीबेकी**– (पु.) एक खेळ; एकीबेकी ३०८१; एकीबेकीन्याय – नशिबाने मिळणारा न्याय ४२७६.

**एकीसवा**– (क्रि.वि.) एका बाजूस ४.

**एखादा**– (वि.) विरळा; एखादा १३१६; एखादिया १८९१.

**एथील**– (क्रि.वि.) या ठिकाणचा ८२६.

**एरंड**– (पु.) एक झुडुप ६०.

**एर**– (वि.) अन्य, दुसरा १४८.

**एरवी**– (क्रि.वि.) अन्य वेळी १८१३.

**एव्याच**– (क्रि.वि.) उगाच ४२२.

## ऐ

**ऐकणे**– (क्रि.) श्रवण करणे; ऐका १०७, १४१२; ऐकती १९१; ऐकतो १३३०; ऐकिजेसी १९३३.

**ऐक्य–आइक्य**– (न.) एकता; ऐक्यभाव ७६०; आइक्य ३४३६; आइक्यता ३७४३.

**ऐती**– (वि.) तयार १५१४.

**ऐरण**– (स्त्री.) दागिने घडविण्याची लोखंडी बैठक ५०.

**ऐरावत**– (वि.ना.) इंद्राचा हत्ती १२८२.

**ऐल**– (क्रि.वि.) अलिकडे; ऐल ३२२२; ऐलपैल – अलिकडे व पलिकडे २०४३.

**ऐवज**– (पु.) मालमत्ता १९८१.

**ऐसी**– (सं.वि.) ऐंशी ४०५४.

**ऐसे**– (स.ना.) असेए ५, ६०; ऐसी ५; ऐसे ७१, ९३, १३५५; ऐसियाचा १०५; ऐसा १११, १३५९; ऐसी १९४; ऐसी जेव्हडा १२९०.

## ओ

**ओंकार**– (पु.) **परमेश्वराचे प्रणवरूप**; ओंकाराचे १७६९, २०५४;

**ओम्**– २६८६;

**ओम्तत्सदिति** – **ब्रह्म हेच खरे आहे** ४५०३.

**ओंगळ**– (वि.) **गलिच्छ** ६५८, २७०७.

**ओक**– (पु.) १) **ओकारी**; ओकाचा २२८६;
२) **तिरस्कार करण्याजोगे**; ओक २५९.

**ओकणे**– (क्रि.) **उलटी होणे, ओकारी होणे**; ओकलिया ५८६; ओकुनिया १०५७; ओकवी ३४१७; ओकविते ३६०१.

**ओखट**– (वि.) **वाईट**, अप्रिय; ओखटे १९.

**ओखद**– (न.) **औषध** ८७२; ओखदासी १०७७; ओखदा ११२४.

**ओघ**– (पु.) **प्रवाह** ७०१; ओघा २०५१; ओघी २२३५; ओघाची ३७२६.

**ओज**– (वि.) १) **चव, रुची** १५४१;
२) **नीट, सरळ**; ओजेचे ३७६६;
(वा.प्र.) **ओज करणे** – स्वच्छ करणे १५७.

**ओझे**– (न.) भार ६०२, ११४०, १६५८.

**ओटी**– (स्त्री.) **ओसरी** ८२३.

**ओठ**– (पु.) **ओठ**; ओठीं १४८, २६५२; ओठ ६२१; ओटी १००२;
(वा.प्र.) **ओठी लावणे** – तोंडाला लावणे. २१५०.

**ओडवणे**– (क्रि.) **प्राप्त होणे**; ओडवेना ४१३१.

**ओढ**– (स्त्री.) १) **आकर्षण**; ओढी ७८२, ८३९;
(वा.प्र.) **ओढी भरणे** – मागे लागणे १३९६;
२) **ओढगस्त**; ओढीचे १९५९;
३) **उतावीळ**; ओढे ४४३९; ओढाओढी ३४७०.

**ओढणे**– (क्रि.) १) **वेध लागणे**; ओढे १२५९; ओढलिया १४२४; ओढतसे ३६९३;
२) **समाचार घेणे**; ओढे १४०३; **वाहून नेणे, ओढून नेणे**; ओढाओढी ६४०.

**ओढवणे**– (क्रि.) **ओढून नेणे**; ओढिती ६२३; ओढतसे १३२९; ओढिलीया – (वि.) **ओढणारी** ३५७५.

**ओढाळ**– (वि.) १) **स्वैर धावणारे** २२४, ११२०; ओढाळा २३३; ओढाळाची ८५१; ओढाळाच्या ३४०३;
२) **पापी**; ओढाळांचे १३०२.

**ओणवा**– (वि.) **कमरेत वाकलेला**; ओणवे १३९.

**ओतणे** – (क्रि.) १) **आकारास येणे**; ओतले ४; ओतली ७४७;
२) **उमटणे**; ओतलासे ३२५१; ओतत ४०३४.

**ओतीव**– (वि.) **ओतून तयार केलेले** ६, ४४५९;

**ओनामा** – (पु.) **शिक्षणाचा प्रारंभ** ७४३.

**ओल**– (स्त्री.) १) **दाट** ३३;
२) **ओली जमीन**; ओल १४९५; ओल्या २९४४; ओल्या मातीचा-देह ४०३१;
३) **प्रेमभाव, आपुलकी**; ओल १५४, १४१२.

**ओलावा**– (पु.) **प्रेमभाव, जिव्हाळा** १४७४, ३७६१.

**ओले**–(वि.) **पातळ कालवण** १४००; ओल्या ३९४४; ओल्या कोरड्या (वि.) **कालवणासह** ५७०.

**ओलावणे**– (क्रि.) १) **पाणी मिळणे**; ओलावे २०२८;
२) **ओली होणे**; ओलावली २०३५;
३) **छंद लागणे**; ओलावली २७३४.

**ओवणी**– (स्त्री.) **माळ** ७१५.

**ओवणे**– (क्रि.) १) **गुंफणे**; ओवूनिया ७३३;
२) **लिहिणे**; ओवीन ४३५७.

**ओवळा**– (वि.) १) **अविचारी** ३३९३;
२) **अपवित्र**; ओवळे ४३३२.

**ओवाळणे**– (क्रि.) **औक्षण करणे**; ओवाळिली ४४६; आवाळूं ५०७, १५७१; ओवाळूनि ५४५, १२९४; ओवाळीन ८२८; ओवाळिती ११०५;
(वा.प्र.) **ओवाळून टाकणे** – त्याग करणे २२४६.

**ओवी**– (स्त्री.) **पद्यातील एक छंद** १५८; ओविया ८१२, १६४९; ओविये ११०६; ओवियेसी १५६८; ओव्या १९७२.

**ओशाळ**– (वि.) **मिंधा** १७५०.

**ओसंग**– (स्त्री.) **मांडी**; ओसंगा ४५०४.

**ओस**– (वि.) १) **ओसाड, निर्मनुष्य** २१०, ५३०; ओशा ३४३४;
२) **उद्ध्वस्त**; ओस ५७१;
३) **रिकामे**; ओस ८२७;
४) **अभाव**; ओस १६८१.

**ओसरणे**– (क्रि.) **कमी होणे**; ओसरता ५५१; ओसरे १७२५.

**ओहळ**– (पु.) **पाण्याचा लहान प्रवाह** २०५०.

**ओळ**– (स्त्री.) **श्रेणी, दर्जा**; ओळी १०६९; ओळीचा १०७१.

**ओळखण**– (स्त्री.) **ओळख** ७०२.

**ओळखणे**– (क्रि.) **जाणणे**; ओळखा ११८; ओळंखावे ८६०; ओळखे १०७२.

**ओळखी**– (स्त्री.) **ओळख** ३२३.



## औ

**औट, औठ**– (सं.वि.) **साडेतीन**; औठडे – **साडेतीन हाताचा देह** १४८५; औट २०१६.

**औदार्य**– (न.) **उदारपणा**; औदार्याची ११०३.

**औषध**– (न.) **रोग नष्ट करणारा पदार्थ** १६; औषधी ६९१.

## कं

**कंकणचुडा**– (पु.) **बांगडी** २१९३.

**कंकर**– (पु.) **दगडाचा तुकडा** ३७९.

**कंटक**– (पु.) **उपद्रव देणारा**; कंटकांची २६४; कंटकवाटा – (स्त्री.) **खडतर वाट** ३५७.

**कंटाळा**– (पु.) **आळस** १५०१.

**कंठ**– (पु.) १) **गळा**; कंठी २, ४४५, ११०८; कंठाजोगी – **गळ्यास अनुरूप** ३२९८;
२) **आवाज**; कंठ ७८;
३) **हृदय**; कंठी १९७६; कंठस्फोट – (पु.) **ओरडणे** १४३, ६३१; कंठाकंठ – (पु.) **गळामिठी** ४५८०; कंठाकंठी – (पु.) **गळ्यात गळा घालून**, गळामिठी २३६६; कंठमाळ – (स्त्री.) **गळ्यातील माळ** २८२७;
(वा.प्र.) **कंठी साठवणे** – नामस्मरण करणे २६१; **कंठ दाटणे**– गहिवरून येणे ६१९; **कंठी धरणे** –स्मरणे १०२९; **कंठकंठा मिळणे** – एकरूप होणे १६७०; **कंठ फुटणे**– आवाज बसणे २९६८.

**कंठणे**– (क्रि.) **काळ घालवणे**; कंठू १२७९; कंठीतसे ३६९६; कंठवेना ४४३०.

**कंथा**– (स्त्री.) **वाकळ**, गोधडी १८३८.

**कंद**– (पु.) **गड्डा** ३९८७; कंदेमुळे १८५१, ४५०६.

**कंस**– (वि.ना.) **मथुरेचा राजा**; कंसासी १५७६; कंसा २८३६; कंसराव ३०५४; कंसराणा ४३७५.

## क

**कइचा** पाहा **कैचा**.

**कइवार** पाहा **कैवार**.

**कई**– (प्र.स.ना.) **केव्हा** ४०९, ३३३५.

**कईपक्षी**– (वि.) **कैवारी** ३२२६.

**कईवाड**– (पु.) **प्रयत्न** १४००.

**कचाटी**– (स्त्री.) **कटकट** ८०९.

**कट**– (स्त्री.) **कंबर** २,१११, १५००, २६३४; कटीं ५, ६५२, १२४८. कटावरी ५; कटसूत्र – (पु.) **कडदोरा** १११०; कटिकर (पु.) २७८२.

**कटकट**– (स्त्री.) १) **त्रास** २१५, १५९४;
२) **बडबड**; कटकट २३४६.

**कटाक्ष**– (पु.) **नजर**; कटाक्षे ३५९५.

**कटवे**– (न.) **कारले**; कटवेचि ९७५.

**कठीण**– (वि.) १) **निष्ठुर**," **कठोर**; कठिण १३३, १४५६, १६६३; कठिणे १९६२; कठिणता ९५५;
२) **अभेद्य**; कठिण ९८७, १०१०;
३) **असह्य**; कठीण १२८२;
४) **कडू**; कठीण १७५३.

**कडकडणे**– (क्रि.) **कडकड असा आवाज होणे**; कडकडी २४०१.

**कडदोरा**– (पु.) **कंबरेला बांधायचा गोफ** ३३८.

**कडबिड**– (न.) **किडुकमिडुक** ३६१२.

**कडशिणे**– (क्रि.) **शुद्ध करणे, निवडणे**; कडशिले ४३३१.

**कडसणी**– (स्त्री.) **विचार** २५१४.

**कडा**– (पु.) १) **डोंगराची सीमा** २८५९;
२) **काडकन्**; कडा ३९१.

**कडाडणे**– (क्रि.) १) **गर्जना करणे**; कडाडिला १५७६;
२) **खांब मोडताना होणारा आवाज**; कडाडिला ३०९५.

**कडासन**– (न.) **कातड्याचे आसन** २५०.

**कडिये**– (क्रि.वि.) **कडेवर** १७२, १०२९; कडे १४११; कडियेवरी ४७१, ३३२३; कडियेहूनि ४५४५.

**कडू**– (वि.) १) **त्रासदायक** ५९६; कडुपण ४३०३;
२) **कडवट**; कडू ९८७, २४०२.

**कडूजिरे**– (न.) **कडूजिरे** ४०५५.

**कढ**– (पु.) **आधण**.

**कढई**– (स्त्री.) **लोखंडाचे पसरट भांडे**; कढेमाजी ३८९२.

**कढणे**– (क्रि.) १) **लोणी तापविणे**; कढे २१७९;
२) **तळमळणे**; कढता ३७१०.

**कढत**– (वि.) गरम, **उष्ण** २०७४.

**कढी**– (स्त्री.) **ताकापासून करतात तो पेय पदार्थ** ३८७१.

**कण**– (पु.) १) **धान्याचा कण** ६०;
२) **लहान तुकडा**; कण २३७१.

**कणव**– (स्त्री.) **दया** ९१.

**कणी**– (स्त्री.) **धान्याचा तुकडा** १७९६; कण्या १६००, २८२०; कण्याभोपते – **मऊ कण्या** १००.

**कणीस**– (न.) **धान्याचा गुच्छ** ७६७.

**कथणे**– (क्रि.) **सांगणे, उच्चारणे**; कथी ८४, ७४९.

**कथनी**– (स्त्री.) **निवेदन**.

**कथा**– (स्त्री.) १) **कीर्तन** १२३, ६०९, १४५७; कथेची ४७२, १४६७; कथे ७४७, १३३०;
२) **गोष्ट**; कथा ८१७; कथामृतपान – (न.) **कीर्तन ऐकणे** ५६५; कथाकाळी – (पु.) **कीर्तन प्रसंग** ५९९, २१५४; कथापुराणकीर्तनी – (न.) **पुराण कीर्तनाच्या वेळी** ८१२; कथाश्रवण ९४५; कथाअमृत २००७.

**कथिता**– (पु.) **सांगणारा**; कथित्या ४५०७.

**कदा**– (क्रि.वि.) **केव्हाही**; कदा २९४; कदाकाळी ४०.

**कदान्न**– (न.) **वाईट अन्न** ९२१, ३९३४.

**कधी**– (क्रि.वि.) **केव्हा** ६१३, १४९२; कधीतरी १२८.

**कनक**– (न.) १) **सोने** ३८७, ९२०; कनकाच्या १५८१; कनकत्वा – **सोनेपण** ४३५३;
२) **धोतरा वनस्पती**; कनक ३३५८.

**कनवाळू**– (वि.) **प्रेमळ, दयाळू** १७८४.

**कनिष्ठ**– (वि.) १) **लहान**; **कनिष्ठाची** ८२१;
२) **क्षुद्र गोष्ट**; कनिष्ठी ६४३;
३) **कमी कसाची**; कनिष्ठ ३०५५, ३४३१.

**कन्या**– (स्त्री.) **मुलगी** १२३, २६६, २१७४; कन्याकुमर – (स्त्री.) **मुलेबाळे** २०९, ३९१; कन्यादान (न.) विवाहातील एक विधी २६८; कन्यापुत्रेविण (न.) ३०४; कन्यापुत्रादिक (न.) २४८३.

**कपट**– (न.) **लबाडी, फसवणूक** ५३, १०८५; कपटे १२६५; कपटवसती – (स्त्री.) **मनात कपट बाळगणे** २४४१.

**कपाट**– (न.) १) **दरवाजा** ३७६, ३३९१;
२) **गुहा**; कपाटी ३६१, १३६३, ३४१२.

**कपाळ**– (न.) १) **कपाळ** ३६; कपाळासी २४०२;
२) **नशीब**; कपाळी ३२३, १६५१; कपाळ १९६०; कपाळे ३३४१; कपाळा ३८६५;
३) **कवटी**; कपाळ २७८५;
(वा.प्र.) **कपाळ उठवणे** – संताप आणणे २१९७; **कपाळ उणे असणे** – फुटके नशीब ५२५; **कपाळ फिरणे** – नशीब फिरणे २६९१.

**कपी**– (पु.) **वानर**; कपि ११०४; कपिहाती ११०८; कपिकुळी २८५.

**कफ**– (पु.) १) **कापूस** ११४०;
२) **छातीमधील कफ**; कफ ३०८३; कफवातपित्त – **शरीरातील त्रिदोष** ३२८४.

**कबीर**– (वि.ना.) **उत्तर भारतातील एक संत** ९२, १९०; कबिरा १५६८; कबीराचे २८२०, ४३२१.

**कमंडल**– (न.) **लाकडाचे वा धातूचे पात्र** १२८५; कमंडलू २४८१, ४४६७.

**कमळ**– (न.) **एक फूल** ६२५; कमळणी २०४१; कमळाचे २३७९; कमळापती १७२, २९५६; कमलनयना ६४६; कमललोचना ६७५.

**कमाई**– (स्त्री.) १) **मिळकत**; कमाईस १४२; कमाईच्या ३२५; कमाईचे १०१३; कमाईविण १७१९;
२) **पात्रता**; कमाईचा १०७०.

**कमोदिनी**– (स्त्री.) **कमळ** ५३३.

**करंटा**– (वि.) **दैवहीन** २५९, ८९७; करंटी १८०४, ३७७५.

**करंडी**– (स्त्री.) **फुलांची परडी** १२६३.

**कर**– (पु.) **हात** २, २८४, ६५२; करीं १११, १५००; करें ९६६; करचरण – (पु.) **सर्व देह** ६१३; करकमळ – (न.) **कररूपी कमळ** ३४०८;
(वा.प्र.) **कर जोडणे** – नमस्कार करणे ४९३.

**करकर**– (स्त्री.) **कटकट** ५१५, १९४३, ३४७३.

**करकर**– (क्रि.वि.) **ध्वन्यनुकारी शब्द** ८६.

**करणी**– (स्त्री.) १) **कृत्रिम**; करणीचा ५०;
२) **कृत्य, वागणूक**; करणी ३८९, ७११.

**करणे**– (क्रि.) **करणे**; केले १०; करू १३, १०१; कराल २६; करिसी ४३; कराल ४६; करावी ७१; करूनिया १०१; करीतसे १०७; करिना १९८; करितसा ३४६; करी १०६३; केलिया १३८२; करविते १४०७; कीजे १४९९;
(वा.प्र.) **एक केले** – एकरूप केले १०.

**करपणे**– (क्रि.) **नको इतके भाजणे**; करपो ३६८०.

**करबाडा**– (पु.) **कडबा**; करबाडे ३०७०.

**करमणे**– (क्रि.) **रमणे**; करमेना १५९३; करमे ४५२२.

**करमूर**– (स्त्री.) **कुरबूर, कुरकुर** ३७५.

**करवंडी**– (स्त्री.) **पोटाचा खळगा** ३२६७.

**करविता**– (पु.) **करविणारा** २८८४.

**कराडी**– (स्त्री.) **कष्ट** २३४५.

**करार**– (पु.) **देवाण घेवाणीचे नियम** १०६२.

**करिता**– (पु.) **करणारा**; करित्याचे १८२७.

**करुणा**– (स्त्री.) **दया, सहानुभूती** ४२३, ९६१, २०१७; करुणेची १५५०; करुणाउत्तर – (न.) **आर्तवाणी** २१९; करुणाभाषण – (न.) **दयायुक्त भाषण** ६२१; करुणाकरा (वि.) ६४६; करुणावचनी (न.) ६४९; करुणालया (पु.) ६७३; करुणामूर्ती (वि.) ६७४; करुणाबोले – (न.) **करुणवाणीने** ३७३३;



करुणावंत (वि.) ३८०१; करुणासागरे (वि.) ३९२८; करुणाकल्लोळे (पु.) ४४१२.

**कर्कशा**– (वि.) **भांडखोर** १३३५; कर्कशसंगति (स्त्री.) २०८५.

**कर्ण**– (वि.ना.) **उदारपणासाठी प्रसिद्ध असलेली महाभारतातील व्यक्ती, सूतपुत्र** १३३, २५७.

**कर्ण**– (पु.) **कान** ४२८१; कर्णद्वारे १७३६; कर्णमूळी – **कानापाशी** २६८६.

**कर्णधार**– (वि.) **मार्गदर्शक** ८५०.

**कर्तव्य**– (न.) १) **आवश्यक कर्म**; कर्तव्ये ६८०; कर्तव्याने १५३९; कर्तव्या २११६;
२) **करण्याजोगे**; कर्तव्य ३४६९.

**कर्ता**– (पु.) **करणारा** २८८४; करत्याने ३५१३.

**कर्तृत्व**– (न.) **नित्यकर्मे** १५८८; कर्तृत्वासी २८७१.

**कर्दळ**– (स्त्री.) **केळ**; कर्दळी १११३; कर्दळीगाभा – कर्दळीच्या गाभ्याप्रमाणे १५८१.

**कर्पूर**– (पु.) **कापूर** ४३५४; कर्पुरकांडणी – **कापूर कांडणे** १७९६.

**कर्म**– (न.) १) **लौकिक आचार** ४३, ५५५, २१७४; कर्मी १२३; कर्मा ६३१; कर्माची ८०९;
२) **पूर्वकर्म**; कर्मे २५७, १४५४; कर्मफळ – (न.) **कर्मापासून मिळणारे फळ** ६४; कर्माकर्म (न.) ५५६, ६०८; कर्महीन (वि.) ६१३, २७५३; कर्मभ्रष्ट (वि.) ६१६, ३०५०; कर्मकोठार – (न.) **कर्माचे भांडार** ६३४; कर्मप्रकाशका (वि.) ६७४; कर्मधर्मे (न.) १४५४, १६०३; कर्मांतर (न.) १६५८; कर्मरसे – (पु.) **कर्मापासून** २००२; कर्मगति (स्त्री.) २०४१; कर्मभूमीऐसा – (स्त्री.) **कर्मभूमीला सुसंगत** २८१०; कर्मवाटा (स्त्री.) ३४८०; कर्मसाक्ष (पु.) ४००८.

**कर्मठ**– (वि.) **धार्मिककृत्ये नियमाने करणारा** २०१३.

**कर्मर**– (न.) **शस्त्र, कर्मरी** २२९८; कर्मरी घालणे – **स्वतःच्या शरीरावर शस्त्र चालविणे** ८५७.

**कर्मिणे**– (क्रि.) **क्रमणे, घालवणे, व्यतीत करणे**; कर्मिले ४५९७.

**कर्वत**– (स्त्री.) **लाकूड कापण्याचे शस्त्र**; कर्वती २२९८;
(वा.प्र.) **कर्वती घालणे** – स्वतःच्या शरीरावर शस्त्र चालविणे. ५५८.

**कर्वतिणे**– (क्रि.) **शस्त्र चालविणे**; कर्वतिली ५४८.

**कलि, कळी**– (न.) **कलियुग**; कलि ९६; कलीत ६००; कलीमाजी ४४४०; कलियुगी ४६५, २८७४; कलियुगाच्या ७९३; कलीचे २९७२; कलियुगीचे ३४४७; कलियुगामाजी ९६; कलिधर्म – (पु.) **कलियुगातील आचार** ११२९; कलयुगी ३९२१; कलयुगाची ३९२२; कलयुगा ४०३२; कळीं – **कलियुगात** २६७, १३८५, ४४४०; कळीसारिखे २७२०.

**कलवडू**– (पु.) **शेणामातीने लिंपलेले मडके** ४२१९.

**कलह**– (पु.) **भांडण** २०९; कळह १९४१; कळहे २२६०.

**कलागत**– (स्त्री.) **चहाडी, चुगली**; कलागती १९२२.

**कलिवर, कळिवर**– (न.) **निष्प्राण देह**; कलिवर २५९८; कलिवरेसी ८५५; कळिवर ९९३, १२९४; कळिवरा १४०३; कळेवरी १८५१; कळेवर ३९२३; कळिवराकळवरी – (न.) **शरीराचा** ४२२६.

**कल्प**– (न.) **युग** २५८७; कल्पवरी ५७; कल्पेवरी २४८५; कल्पकोटी – (सं.वि.) **अनंत युगे** १२८५; कल्पकोटीवरी (सं.वि.) १८२१.

**कल्पतरू**– (पु.) **इच्छा पुरविणारा एक काल्पनिक वृक्ष**; कल्पतरूची ४५१; कल्पतरूखाली २०७२; कल्पतरूअंगी २७२९; कल्पतरूछाया (स्त्री.) १३९६.

**कल्पद्रुम**– (पु.) **कल्पतरू**; कल्पद्रुमातळी ४४७२.

**कल्पना**– (स्त्री.) **मनातील भावना**; कल्पनेचा ७३५; १४१६.

**कल्पलता**– (स्त्री.) **इच्छेनुसार फल देणारी वेल** २९४४.

**कल्पांत**– (पु.) **युगांत**; कल्पांतीचे २३५१.

**कल्पिणे**– (क्रि.) **समजणे**; कल्पा १३७३; कल्पवेना १९६९; कल्पिले ३५९७; कल्पितील ४५२४.

**कल्याण**– (स्त्री.) **मंगल** ४७९; कल्याणा १५१०; कल्याणाची २५५३; कल्याणकारक – (वि.) **मंगलदायक** १८८९.

**कल्लोळ**– (पु.) १) **गजर**; कल्लोळ ३३१;
२) **पूर विपुलता**; कल्लोळ ३९१;
३) **ओघ**; कल्लोळ २२४६, ४२३६.

**कल्हार**– (न.) १) **पांढरे कमळ**; कल्हारी ४५५०;
२) **हृदयकमळ**; कल्हारी २७६.

**कल्हे**– (वि.) **मुलाम्याचे** २३७६.

**कव**– (स्त्री.) **मिठी** २४८७, ४५१९;
(वा.प्र.) **कव घालणे** – मिठी मारणे ७७४.

**कवटाळणे**– (क्रि.) **मिठी मारणे**; कवटाळविती ६२३.

**कवटी**– (स्त्री.) **करवंटी** २४४.

**कवडा**– (पु.) **मोठी कवडी** ४६६; कवडे ७९७.

**कवडी–** (स्त्री.) एक नाणे, खेळातील कवड्या १०७४; कौडीकौडीसाठी – एक एक पै साठी ३९३७.
**कवण–** (प्र.स.ना.) कोणते, कोण; कवणाची ५३; कवणे १३३; कवणाचे ३३९; कवणा ४७०; कवणासी १४६३; कवण्या ३३६४; कवणेपरी ५८१; कवणेविषी ६४८.
**कवळ–** (पु.) घास १४५; कवळी ४०, २०१५; कवळाचिया १८०; कवळोकवळी – प्रत्येक घासाबरोबर २८८४;
(वा.प्र.) कवळ करणे– भोजन करणे ४०३२.
**कवळ–** (स्त्री.) कावीळ २४८; कवळे २६४९.
**कवळ–** (पु.) डोळ्यावरचा पडदा ६३३.
**कवळिणे–** (क्रि.) १) मिठी मारणे; कवळिले १४०, ३१६६; कवळूनि १९८; कवळी २८५, २५४४; कवळविती ८०५; कवळीन ३८०२;
२) मिळणे; कवळी ६१५;
३) घेणे; कवळी १०३९;
४) चाटणे; कवळिते १७०२.
**कवाड–** (न.) दार ३९१; कवाडे ४९६;
(वा.प्र.) कवाड घालणे– दार लावणे ३८७.
**कवित्व–** (न.) काव्यरचना ८०४, १३२०, २९७९; कवित्वाची ९७७; कवित्वाचे ३०३९.
**कवी–** (पु.) काव्यकर्ता ७९, १४६८; कविजन (पु.) ११३०; कवीश्वरांचा (पु.) १३९५; कवित्या – कवयित्री ४५०७.
**कष्ट–** (न.) मेहनत, त्रास ३७६, ६६२, ३६८६.
**कष्टणे–** (क्रि.) कष्ट करणे; कष्टवावे ६८६; कष्टलासी १२४८; कष्टवूनि १३३३; कष्टसी २४५९; कष्टविले ३६७२.
**कष्टी–** (वि.) दुःखी १९०, १३६२, ३५४० श्रमी-कष्टी ६७४.
**कस–** (पु.) १) सामर्थ्य ५९६;
२) कसोटी; कसी ९६५;
३) गुण; कस १४१४;
४) काळजीपूर्वक; कसून ३९६३;
(वा.प्र.) कसी उतरणे– कसोटीला उतरणे १३३८, ३६७५.
**कसणी–** (स्त्री.) चोळीचे बंद; कसणीया ३९४.
**कसमळ–** (वि.) दुष्ट, दुर्जन; कसमळापाशी २६१६.
**कसवटी, कसोटी–** (स्त्री.) १) परीक्षा; कसोटी ३४८;
२) योग्यता २४७५;
३) कसोटीचा दगड, सोन्याची शुद्धता पाहण्याचा दगड ३३६५; कसवटी २४०१.
**कशा–** (प्र.स.ना.) कशाचा; कशाचा १८६.
**कसाब–** (पु.) कसाई, खाटिक; कसाबाचे ३५८५; कसाबाची ४३५१.
**कसाळी–** (स्त्री.) बडबड, वटवट १९४१.
**कसिणे–** (क्रि.) तयार होणे, सिद्ध होणे; कसियेले १४०३.
**कस्तुरी–** (स्त्री.) मृगनाभीतील एक सुगंधी पदार्थ ४, ८०३, १७२८; कस्तुरीने १४८१; कस्तुरीचे २९८४; कस्तुरीचा ३८३१; कस्तुरीमळवट – (पु.) कपाळावर दिलेला कस्तुरीचा लेप ४०७२.
**कळंकी–** (वि.) पापी २७०१.
**कळंब–** (पु.) कदंबवृक्ष; कळंबाचे ४५४२; कळंबावरी ३९४; कळंबाबुडी (स्त्री.) २३६.
**कळ–** (स्त्री.) वर्म १२८३.
**कळणे–** (क्रि.) समजणे, आकलन होणे; कळले १; कळो ३०, १३६१; कळता ५४, १३८९; कळे ६९; कळावे ७१; कळसी ६५६; कळोनि १३५२.
**कळत्र–** (न.) पत्नी १९४२.
**कळवळ–** (स्त्री.) प्रेम ८२.
**कळवळणे–** (क्रि.) दया उत्पन्न होणे; कळवळिला ६७८, ३७३८; कळवळे ४४१२.
**कळवळा–** (पु.) प्रेम ६४१, १३०१, ३२११; कळवळ्याने ८५०; कळवळ्याची १५३९.
**कळवा–** (पु.) वेदना २६२४.
**कळस–** (पु.) १) घागर ४५०, ११४६;
२) मुगुट; मुगुट ५१३;
३) शिखराचा सर्वात वरचा भाग; कळस ४७३, १८३३;
४) परिसीमा; कसळ २२२२;
(वा.प्र.) कळसा येणे– १. पूर्णतेला येणे ८२८; २. निर्वाणीचे बोलणे ३३२४.
**कळसी–** (क्रि.वि.) अखेरीस २२२८.
**कळांतर–** (न.) व्याज; कळांतराची २८७३.
**कळा–** (स्त्री.) १) क्रीडा १०४, ५००, १३५३;
२) ज्ञान; कळा २२१;
३) वागणूक; कळा ४५६;
४) युक्ती; कळ ५४६, २०६४;
५) तेज; कळा ६१८;
६) किरण; कळा ११११;
७) स्थिती; कळा १२५९;
८) कारागिरी; कळा १२८४;



९) रूप; कळा ३०५०;
१०) ढोंग, नाटक; कळा ४३१०; कळाहानी – (स्त्री.) निस्तेज ७९४; कळाकुसरी – (स्त्री.) संगीतातील नैपुण्य २९५६.
**कळि–** (पु.) संकट १२१२.
**कळिकाळ–** (पु.) काळ, यम १४३, ११३८, १४९८; कळिकाळा १९४, ७१८; कळिकाळासी ५१९, १४४३; कळिकाळाशी ५७६; कळि–काळाचा ९०९; कळिकाळावरी १८९.
**कळी–** (स्त्री.) १) उपाधी, त्रास १४१;
२) तंटा, कलह; कळी ३६०३.
**कांचन–** (न.) सोने; कांचनाची ३०८५.
**कांजी–** (स्त्री.) पेज २६२.
**कांटाळणे–** (क्रि.) कंटाळा करणे; कांटाळलो १०१६; कांटाळला २९४२.
**कांटाळा–** (पु.) कंटाळा ३८८, १६७५; कांटाळ्याच्या ३१९६.
**कांडण–** (न.) धान्य सडणे १५७; कांडणी ८१२, ३०३९.
**कांडणे–** (क्रि.) धान्य कुटणे; कांडिता १५८, १८५३; कांडिती १४१२, ३६९१; कांडी १५९४; कांडवी ४२९६.
**कांडी–** (स्त्री.) काडी ३८७०.
**कांत–** (पु.) पती; कांता ३५९, १६७७.
**कांता–** (स्त्री.) पत्नी २३९४; कांतायुत – बायका-मुले ४४५३.
**कांति–** (स्त्री.) १) शरीराचे तेज ९१०, १८३५;
२) कातडी; कांति १३१८;
३) शरीर; कांति १९७३.
**कांदा–** (पु.) कांदा ५७९, २२६९; कांद्याचा ८०३; कांद्यासाठी ७९३; कांद्याहूनि २१९८.
**कांबळ–** (स्त्री.) घोंगडी; कांबळी १४८; कांबळे १८२, ३५४१; कांबळा ३९०; कांबळीया ४३८५.
**का–** (प्र.स.ना.) ९७, ९९; कारे ४२; काशासाठी ८०; काशाला ८१; काशाने ९५.
**काई–** (प्र.स.ना.) १) काय ८५, १४१, १०८८;
२) किती; काई १६०, ८०९;
३) काही; काई २४१, १२६६.
**काउळा** (पु.) एक पक्षी; काउळे १५६६; काउळी २०३०; कावळीयासी २४०२; कावळ्याच्या ३८३१.
**काकडा–** (पु.) कापडाची वात १५८२.
**काकण–** (न.) बांगडी ७०; कांकणे १५८; कांकणा १८७६.
**काका–** (पु.) पित्याचा भाऊ १३५, ३९२७.
**काकुलती, काकुळती–** (स्त्री.) विनवणी; काकुळती १८८; काकुलती ६४३, ९४४, २९८०;
(वा.प्र.) काकुलती येणे –गयावया करणे, विनविणे १४८०.
**काख–** (स्त्री.) बगले; काखे २५०, २३३१;
(वा.प्र.) काखा वाढणे – बगलेतील केस वाढणे १४४.
**काग–** (पु.) १) कावळा; कागाचिये २५७; कागा १५६५; कागतालिन्याये ४०४३; कावळा व फांदी यासंबंधीचा न्याय.
२) एक असुर; काग १८०३.
**कागद–** (पु.) कागद; कागद – अभंग लिहिलेले कागद २२४१; कागदाते २९१६; कागदी – कागदावर लिहिलेले ३९२१.
**काच–** (स्त्री.) काच २१८०; काचे ३८०३; कांचवटी – (स्त्री.) काचेचा तुकडा २५५५.
**काच–** (पु.) त्रास; काचे २५१२.
**काचणी–** (स्त्री.) १) त्रास १३९६, ३८०६;
२) घर्षण; काचणी १४००.
**काचणे–** (क्रि.) वळ पडणे; काचे १००३.
**काचाकुची–** (स्त्री.) संकोच ३७१५.
**काची–** (वि.) १) खोटी १०८२;
२) कच्ची; काचा १८४८.
**काचीकुची –** (स्त्री.) टाळाटाळ १३६४.
**काचे–** (वि.) १) कच्चे, खोटे ७०, ३११२;
२) न कढलेले (लोणी); काचे २१७९.
**काचोळी–** (स्त्री.) चोळी ४२४५.
**काज–** (न.) १) काम १०, ८२२, १४५८; काजा ४२५, ५६०; काजे ६५४; काजकैवारी – (वि.) कामाचा कैवारी २३१७;
२) कारण; काज ३३८, ७७८, १३१५.
**काजवा–** (पु.) रात्री चकाकणारा किडा; काजव्याच्या २४९७.
**काजळ–** (न.) डोळ्यात घालायचा पदार्थ ४५९, १७२०.
**काजळी–** (स्त्री.) १) कलंक २१८१;
२) अज्ञानपटल; काजळी ३७८५.
**काट–** (पु.) मळ ३५५२.
**काटणे–** (क्रि.) कापणे; काटले २२६८.
**काटवना–** (पु.) काटेरी मार्ग ६२३.

**काटा**– (पु.) अणकुचिदार काडी १६१४; काटी ४२३; काटे ८३३, ३०७०;
(वा.प्र.) **काटा मोडणे** – पायात काटा घुसणे ४०४; **काटा सारणे** – काटे दूर करणे ३१२७.
**काटी**– (स्त्री.) १) काठी ४०२७; काटीवरी ३५६;
२) शरीरावर; काटिवरी ४३६२;
(वा.प्र.) **काटीवरी घेणे** – शिक्षा करणे ३४६६.
**काट्यावन**– (न.) काटे असलेले वन १९३.
**काठ**– (पु.) किनारा, तीर; काठीच ४५४६.
**काठी**– (स्त्री.) १) काठी १४८, १००३, २७९५; काठिया १४८; काठ्या २०९;
२) आघात; काठी १४३४;
३) देह; काठी ४३६२;
(वा.प्र.) **काठी लागणे** – बरोबर चालणे ४४९०; **काठीवर घेणे** – झोडपणे ४३१९.
**काडी**– (स्त्री.) लहान काटकी २५३;
(वा.प्र.) **काड्या मोडणे** – परस्परापासून दूर करणे २१२.
**काढणे**– (क्रि.) १) बाहेर काढणे; काढी १७७; काढावा ३४२३;
२) सोसणे; काढिले १४०३.
**काढा**– (पु.) औषधी वनस्पतींचे पेय १७५३, ३१२७.
**काढाकाढी**– (स्त्री.) १) बाहेर काढणे १७८०;
२) निरवानिरव; काढाकाढी ४३५१.
**कातडे**– (न.) चामडे; कातडी २६७ (पद्य).
**कातणे**– (क्रि.) १) रागावणे; कातेली २६९;
२) पिसाळणे; कातेलेसे ५७२.
**कातर**– (वि.) हळवे १८६९.
**कातिव**– (वि.) नक्षीदार; कातिवे २०४७.
**कान**– (पु.) कान १५९, १३०२, ३०७३; कानी ११, २५३, १३५०; कानें ९५०; कानकोंडे – (वि.) ओशाळवाणे १६१७; कानगोठी – (स्त्री.) अन्य बोलणे १६६०; कानसुली – (स्त्री.) कानाजवळ २७१८;
(वा.प्र.) **कानी पडणे** – ऐकू येणे १४९, ४१६; **कान पसरणे** – कान टवकारून ऐकणे २८२; **कान नसणे** – लक्ष न देणे ४००; **कान फुंकणे** – उपदेश करणे १३४२; **कानी धरणे** – केवळ ऐकणे १४६१; **कान लावणे** – लक्ष देणे २२३०; **कान भरून ऐकणे** – मनापासून ऐकणे २४३४.
**कानडा**– (वि.) कानडी ब्राह्मण ४३५६.
**कानडी**– (स्त्री.) कानडी बोलणारी स्त्री; कानडीने ८७.
**कानवडे**– (वि.) वेडेवाकडे २३५५.
**काना**– (पु.) व्यंजनापुढची उभी रेघ १५२३.
**कानेकोंचे**– (वि.) तिरळा ३८२३.
**कान्हया पाटक**– (वि.ना.) भक्त कवी; कान्हया पाटका १५६८.
**कान्हा**– (वि.ना.) बालकृष्ण ३७८, १५५१; कान्हया २३६१.
**कान्हाबाई**– (स्त्री.) कृष्ण २२७९.
**कान्हो, कान्होबा**– (वि.ना.) कृष्ण; कान्हो १४२, ४०४; कान्होबा १८१, ३३११; कान्होबाचा ४२७६.
**कान्होपात्रा**– (वि.ना.) संत कवयित्री ४२९९.
**काप**– (पु.) कंप २७०, २४८७;
(वा.प्र.) **कांप सुटणे** – थरकाप होणे २७०; **कांप भरणे** – थरकाप होणे ६२५.
**कापड**– (न.) वस्त्र ४५४.
**कापडी**– (पु.) यात्रेकरू ४५०; कापडियां १९५४.
**कापणे**– (क्रि.) १) चिरणे; कापू ६६; कापे ७७; कापावया ९४; कापविसी १५५; कापिती २५६; कापियेले ५४८;
२) थरथरणे; कापे ८४, ७९२;
३) अंगाचा थरकाप होणे; घाबरणे; कापती २९८, ४१९, १११२, १५७५.
**कापुर**– (पु.) एक सुगंधी द्रव्य; कापुराचे ३८३९; कापूरू ४३७८; कापुरासी ४४८१.
**कापुस**– (पु.) कापुस १७५८.
**काबाड**– (न.) श्रम १७६९; काबाडाचा १७७३; काबाडापासूनि २५३७.
**काबाडी**– (वि.) श्रम करणारा ४१०७.
**काम**– (न.) १) उपयोग, मदत ८५; कामा ८६;
(वा.प्र.) **कामा न येणे** – उपयोगी न पडणे ५३३; **कामा येणे** – उपयोगी पडणे १४९६.
२) कार्य; काम १०, ४०६, १३५४; कामी १९५, ५१९.
**काम**– (पु.) विषय वासना ८, ४१६, १३२५; कामें १८८, ३८७; कामी ५९९; कामासी १०३९; कामा १२५०; कामावरी ५२; कामबाणी (पु.) ४०६; कामक्रोधी (पु.) ५८०; क्रोधसुनी कामक्रोधरूपी – कुत्र्यांनी २२५५; कामक्रोधमाया (स्त्री.) २६२८; कामक्रोधादि (पु.) ४१८७; कामसंसार – (पु.) वासनेने भरलेला संसार १३०८; कामीमना (न.) १३३०; काममोहे (पु.) २२०९; कामरंग – (पु.) विषयांच्या विचाराने ३४६३; कामातुरा – (पु.) लंपट १८२७, ३७६५; कामभोग (पु.) ४१०७.



**कामधंदा**– (पु.) उद्योग ६७४.
**कामधेनु**– (स्त्री.) इच्छित पूर्ण करणारी गाय; कामधेनू ४५४, १५४४; कामधेनूचिया ४४; कामधेनूचे २१३; कामधेनुऐशी १५३०.
**कामना**– (स्त्री.) इच्छा, वासना १३२५; कामनेच्या ४४; कामनेवेगळा – इच्छारहित ३२०५.
**कामारी**– (स्त्री.) दासी ३७४, ६२९, २०२५; कामारीसांगाते ४०.
**कामविता**– (वि.) मिळविणारा २६२२.
**कामावणे**– (क्रि.) १) मिळविणे; कामावल्या २६०१;
२) तयार करणे; कामाविले ४१०१.
**कामिक**– (वि.) लोभी; कामिकांची ८००.
**कामिनी**– (स्त्री.) १) विलासिनी १११२; कामिनीशी ३१२; कामिनीमोहना – (स्त्री.) मोह घालणारी स्त्री ६४६;
२) पत्नी; कामिनी ४५०२.
**कामिनी** – (स्त्री.) कावीळ ८१६.
**काय**– (प्र.स.ना.) ४२; काय एक – काही एक ६४.
**काया**– (स्त्री.) शरीर १९२, ७८३, १३६६; कायेचेचि ३६८६; कायावाचामनेंसहित ७७३; कायावाचामने ७९०; कायावाचामनोभावे १४२६; कायाक्लेशगंगाजळ कायाक्लेशरूपी गंगाजळ ३५१७; कायाक्लेशेसी ३७६६; कायामनेवाचा ४०१४; कायावाचाचित्त ४११३;
(वा.प्र.) **काया कुरवंडी करणे** – देह ओवाळून टाकणे ८४८.
**कारंजे**– (न.) पाण्याचे कारंजे; कारंज्याची १३५३.
**कारण**– (न.) १) निमित्त, प्रयोजन, हेतू ६०९, ८९४; कारणी ६२; कारणासी ५२०; कारणे ३१८९; कारणापें ३७१४;
२) निकष; कारण १२३;
३) उपयोग; कारणा ६३९; कारणशरीर – शरीराचे कार्य ४२०३;
(वा.प्र.) **कारणी लागणे** – कृतकृत्य होणे ६४४.
**कारणी**– (स्त्री.) वागणूक ८६७.
**कारभार**– (पु.) कामकाज २७३१.
**कारियाकारण**– (न.)१३१६ (पाहा) कार्यकारण; कारियाची ३५९६; कारियासी ३५९८; कारियेकारण २५६६.
**कार्तिकी**– (स्त्री.) पंढरपूरची कार्तिकी यात्रा १५७५, २११७.
**कार्य**– (न.) काम ६४०; कार्याचि ३१८९; कार्यसिद्धि १४००, २६८६; कार्यकारणापुरते १४२८; कार्यकारणाची १४८५; कार्यकारणासरिसे २१७५.
**काऱ्हेळे**– (न.) कडू कारळे; काऱ्हेळ्याची ३५८५.
**कालचक्र**– (न.) जन्ममृत्यूचे चक्र ३५४१.
**कालभूत**– (न.) पेंढा भरून ठेवलेले वाघाचे भूत ३३६५.
**कालविणे**– (क्रि.) मिसळणे, एकत्रित करणे; कालवूनि २५२, २३७४; कालवी २६९१.
**काला**– (पु.) १) निरनिराळे अन्नपदार्थ एकत्र करणे १४८, ४६७, ९०२, ४२०५; काल्याचे १६१; काल्याचिये २०८; कालियाचे २१८१;
२) कीर्तनानंतरचा प्रसाद, काला २४७४.
**कावड**– (स्त्री.) पाण्याची कावड; कावडी ४५०, ४५५८.
**कावरे**– (न.) पीडा ४१९.
**काव्हणे**– (क्रि.) रागावणे; काव्हविता १३६५.
**काशी, कासी**– (स्त्री.) एक तीर्थक्षेत्र; काशी १३७, १७३५, ४४२५; काशीयात्रा (स्त्री.) ४४२७; काशीपुरी (स्त्री.) ४४८९; कासी ४०४७; कासियेसी ४३१८.
**काष्ठ**– (न.) लाकूड ५९, १११३, २०४७; काष्ठा ५२३; काष्ठे ६३४; काष्ठाचा १८९८; काष्ठी ३०९५; काष्ठी ४२८९; काष्ठामाजी १५२६; काष्ठजात – सर्व प्रकारचे लाकूड ३८२७.
**काष्ठिका**– (स्त्री.) लहान काठी २२०.
**कास**– (स्त्री.) १) कंबर, कटी २, ६२६, १६७४; कासे ४;
(वा.प्र.) **कास घालणे** – कंबर कसणे १८९, ७४२, १७७७; **कास धरणे** – आधार घेणे ३६२; **कासे लागणे** – आधार घेणे ६९७;
२) काच्या, धोतर नेसण्याची एक पद्धत; कास ५, १९५.
**कासया**– (प्र.स.ना.) कशासाठी १०७, १५२२; कासयाचा ८३४; कासयाने – कशाने १२९९; कासयाने – कशासाठी १३९२; कासियाने १७२९.
**कासव**– (न.) एक जलचर प्राणी; कासवाचे ३३५६.
**कासवी**– (स्त्री.) एक जलचर प्राणी; कासवीचे ३५७२.
**कासावीस**– (वि.) कष्टी, दुःखी ९१, ७०३, १९४५.
**कासे**– (न.) एक धातू; काशाची २६२; काशा ३०८५; कासेपणे २६२.

**कासोटा–** (पु.) धोतराचा वा लुगड्याचा मागे खोचलेला भाग ३९३५.
**काहणी–** (स्त्री.) गोष्ट, कथा; काहाणी ८७६; काहण्या २०९.
**काहार–** (पु.) छळ, त्रास १३३; काहारे १३३४.
**काहाळ–** (स्त्री.) झांज; काहाळा ७४१, ४५२६.
**काही–** (क्रि.वि.) १) थोडे, निराळे ३, ८४, १३५७; काही एक ४०५; काहीबाही ३५३९; काई ३४३;
२) अनपेक्षित; काहींच्या काही ३२५१.
**काळ–** (पु.) १) काल , वेळ ३, २८, ७२२; काळी १८२, १३३७; काळें ७४३; काळवरी १२७४; काळगती – (स्त्री.) कालचक्राची गती ३१७३; काळचक्री (स्त्री.) ६१७; काळवर्तमान (पु.) ८७९; काळक्षेप (पु.) १६०४;
(वा.प्र.) काळ सारणे – वेळ घालवणे ६३७; काळ कडे लावणे – काळ व्यतीत करणे १९१८;
२) यम; काळे ५४; काळ ५९, ६१८; काळाहाती – (पु.) यमाच्या हाती ३१२; काळदंड (पु.) ६२३; काळपाश (पु.) ६२७; काळसत्ता (स्त्री.) ८२३; काळगर्भादियोनी – (स्त्री.) जन्ममरणाची फेरी ११०९; काळकृतांत (पु.) ४४२३; काळाचे आहारी पडणे – मृत्यूच्या तावडीत सापडणे ६२२;
३) कालांतर; काळे ११३;
४) संकट काळ; काळी ६०८;
५) मृत्यू – काळ ११०९;
६) अशुभ; काळे २३८४.
**काळकुट–** (न.) जलाल विष १२८८, २२७२; काळकुट – काळाकुट्टरंग ३३७.
**काळा–** (पु.) १) काळ्या वर्णाचा ६५८; काळी ३९०, ७९३; काळे ४११, १३९५; १४७१
२) विठ्ठल ३७६, ५२९.
**काळिमा–** (पु.) १) काजळी; काळिमेने १७२२;
२) कलुषित; काळिमा २४०२;
३) अपमान; काळिमेचे ३१७५.
**काळिया–** (वि.ना.) कालिया नाग १५३; काळ्या ४२३४; काळ्याकृतांत धुधुकारे – (पु.) यमरूपी; काळाच्या फुत्काराने ४५५०.
**काळी–** (स्त्री.) जमीन १४९५.
**काळेतोंड–** (न.) १) अपशकुनी तोंड १४७१; काळतोंडा २१२४;
२) दुराचारी; काळतोंडे २२२६.
**काळोख–** (पु.) अंधार; काळोखाचे ४०८.
**काळोखी–** (वि.) १) अंधारी १२९;
२) अज्ञान; काळोखी १८४२.
**किंकर–** (पु.) १) दास २६२, ४४५८; किंकरा २३३४; किंकरी ३९६२;
२) दूत; किंकरा २०४४.
**किंवा–** (क्रि.वि.) अथवा ७१.
**किडा–** (पु.) कीटक, आळी; कीडे ७५, ३५१३, ४३६६; कीड्यामाजी ४४४३.
**किती–** (प्र.स.ना.) ११७, १२९६.
**कितेक–** (स.ना.) कित्येक; कितेकांची ४१४.
**किन्नर–** (पु.) स्वर्गातील गायक ४१५६.
**किलकिल–** (स्त्री.) कलकलाट ३७८.
**किली–** (स्त्री.) किल्ली; किलिया ४५०९.
**किल्मिष–** (न.) संशय, शंका १४६५.
**की–** (क्रि.वि.) किंवा १०१३.
**कीट–** (स्त्री.) घाण १५२२.
**कीटक–** (पु.) किडा ६९७, १७३५; कीटका २४७७.
**कीर–किर–** (क्रि.वि.) खरोखर ९५, ३१११; किर १४०;
**कीरवे–** (स्त्री.) डुक्कर; कीरव्या ३९७०.
**कीर्ण–** (पु.) प्रकाश किरण; कीर्णी ८८३.
**कीर्तन–** (न.) १) हरिकथा ५९, ७४२, १४०४; कीर्तनी १९३, ८१८, १४३८; कीर्तने ६०४; कीर्तनाचा ६२९; कीर्तनींची ८३८; कीर्तनेवाचूनिया ८७१;
२) गुणगान; कीर्तन १२९१, २४०६.
**कीर्ति–** (स्त्री.) लौकिक ३२२, ७०५, ११३०; कीर्तिविण १०३५; कीर्त १४७७; कीर्तिघोष (पु.) ३६२०.
**कीव–** (स्त्री.) दया २२९, ७८३, १५९५; कीव भाकणे – विनवणी करणे ६३६, ३७९४.
**कीस–** (पु.) चुरा ४०५९.
**कुंकुम–** (न.) कुंकू; कुंकुमाची १११२; कुंकवाची ४०३६.
**कुंकूड–** (क्रि.वि.) कोणीकडे २२०६.
**कुंचा–** (पु.) १) चवरी; कुंचे ४७४;
२) मोरपिसांचा कुंचा; कुंचे १९७७.
**कुंची–** (क्रि.वि.) उगीच, खोटी ४५३७.
**कुंटणे–** (क्रि.) कुंठित होणे; कुंटेची ५४३; कुंटी ७०७; कुंटितचि ७३९, २२०९.
**कुंटणी–** (स्त्री.) १) मुलींना कुमार्गाला लावणारी स्त्री ६६;
२) वेश्या; कुंटणी २७९८, ३०८६;



३) पिंगला नामक वेश्या; कुंटणी ३५५२.
**कुंड–** (न.) १) परटाची कुंडी ५९;
२) चांभाराची कुंडी; कुंड २९८२;
३) उकिरडा; कुंड ३६१०.
**कुंडल–** (न.) कानातील अलंकार; कुंडले ४, १५८१; कुंडलां १५७७.
**कुंथणे–** (क्रि.) १) कुंथणे; कुंथुनि ७९; कुंथाच्या १०७; कुंथे ५६६; कुंथसील ८७८; कुंथाकुंथी ७०;
२) कुरकुर करणे; कुंथे ३१४८.
**कुंप–** (न.) कुंपण ४२३.
**कुंभ–** (पु.) घट २८७, ३५९३.
**कुंभकर्ण–** (वि.ना.) रावणाचा भाऊ ४०५४.
**कुंभपाक–** (पु.) एक नरक; कुंभपाकाची ७७; कुंभीपाक ११७; कुंभपाकी १७३०.
**कुंभयातना–** (स्त्री.) कुंभपाक नरकातील वेदना ६२३.
**कुंभार–** (वि.ना.) गोरा कुंभार; कुंभाराचे ४३२१.
**कुकारा–** (पु.) हाक;
(वा.प्र.) कुकारे घालणे – हाक मारणे २१६.
**कुचर–** (वि.) १) न शिजणारा १३७, ९००, २९५७; कुचराचा २३३६;
२) अंगचोर; कुचर १०६९, २०३६;
३) निंदक; कुचराचे १३०२;
४) भित्रा; कुचराला २०४३.
**कुच्या–** (वि.) १) मार खाणारा ८५१;
२) ठोसा; कुच्या ३०६६.
**कुटणे–** (क्रि.) १) वाजविणे; कुटिते ५७१;
२) बडवून मऊ करणे; कुटल्याविण १००३;
३) मारणे; कुटितील १२२१, ४५४३.
**कुटिल–** (वि.) दुष्ट २७८९.
**कुटी–** (वि.) कडवट;
(वा.प्र.) कुटी खाणे – कडवट बोलणे १२५१.
**कुटीमेटी–** (स्त्री.) घरदार २१९.
**कुटुंब–** (न.) घरातील परिवार; कुटुंबाची ६०, २३१३; कुटुंबी – कुटुंबाचे ७३; कुटुंबाचा २५१, २४६२; कुटुंबवत्सला – (वि.) भक्तवत्सल ५०१; कुटुंबचिंता (स्त्री.) ४२०७.
**कुठोरि–** (पु.) कोठारी, आश्रय देणारा १०९१; कुठोऱ्याचे ११३७.
**कुड–** (न.) झोपडी १८१३; कुडीकवाडी – घरीदारी, सर्वत्र २०५८.
**कुडकुडा–** (वि.) दीन ३२९६.
**कुडण–** (न.) प्रतिबंध ४५०६.
**कुडपिणे–** (क्रि.) टाकणे, सोडणे ४६१.
**कुडा–** (पु.) १) खोटा; कुडे ११६, ७३५;
२) वाईट; कुडी १४७, २४३३; कुडे १०३५, १४०९; कुड्या २४५४;
३) चेटुक २७२.
**कुडावा, कुढावा–** (पु.) संरक्षण; कुडावा ३२२; कुढावा १०७४.
**कुडी–** (स्त्री.) देह ३३९, १७४७; कुडीचे ६३४; कुडीसहित १६०६.
**कुढणे–** (क्रि.) १) खंत करणे, कष्टी होणे; कुढावयाचेचि २५८५;
२) रक्षण करणे; कुढावया २६२९.
**कुणबी–** (पु.) शेती करणाऱ्या जातीचा ३२०; कुणबियाचे ८२३; कुणबियाचा ३७५२.
**कुतरा–** (पु.) कुत्रा; कुतऱ्यांनी ५६; कुतरी ६०; कुतरे ८६०; कुतऱ्याऐसे २२०३.
**कुतरी–** (स्त्री.) कुत्री १५२; कुतऱ्या ७४९.
**कुतर्क–** (पु.) अयोग्य तर्क ८९६; कुतर्क्याचे २२९९.
**कुधन–** (वि.) वाईट मार्गाने मिळविलेला पैसा; कुधनाचे – वाईट मार्गाने पैसा मिळविणाराचे २४०२.
**कुपथ्य–** (न.) शरीराला अपाय करणारे ४०४४; कुपथ्याचे १५२२.
**कुबुद्धि–** (स्त्री.) दुर्बुद्धी २८२७.
**कुबेर–** (वि.ना.) देवांचा खजिनदार २१६८; कुबेराचे ३९४९.
**कुब्जा–** (स्त्री.) कंसाची दासी १००; कुब्जेशी ६५८; कुबजा ४४६०.
**कुमर–** (पु.) मुलगा ३३८; कुमरा २८३.
**कुमारी–** (स्त्री.) अविवाहित मुलगी २५७; कुमारीचा ८९९; कुमारिकेपाशी ४७२०.
**कुरंगिणी–** (स्त्री.) हरिणी ३३९.
**कुरंगीपाडस–** (न.) हरिणीचे पिलू ४३८२.
**कुरवंडी–** (न.) ओवाळून टाकणे १५७२; कुरोंडी २७४५; कुरुवंडी ३९८१.
**कुरवाळणे–** (क्रि.) प्रेमाने शरीरावरून हात फिरविणे; कुरवाळिला ३७०; कुरवाळील ६१९; कुर्वाळूनि १११८; कुर्वाळी २९५८; कुर्वाळिता ३३१०; कुर्वाळिते ४५२५.
**कुरुक्षेत्र भूमि–** (न.) एक तीर्थक्षेत्र; कुरुक्षेत्रभूमीवरी २५५०.

**कुऱ्हाड**– (स्त्री.) **लाकडे फोडण्याचे लोखंडी हत्यार**; कुऱ्हाडी ३३१५, ४३२५;
(वा.प्र.) **कुऱ्हाडीचा दांडा** – स्वजनांना घातक ३५२; **कपाळी कुऱ्हाड पडणे** – आपत्ती येणे २०८५.

**कुला**– (पु.) **ढुंगण**; कुले १२८६.

**कुलाळ**– (पु.) **कुंभार**; कुलाळाच्या ८८३.

**कुल्प**– (न.) **कुलूप** २१७१.

**कुविद्या**– (स्त्री.) **वाईट विद्या, खोटी विद्या** ९८.

**कुश**– (वि.ना.) **एक दैत्य** ३१०४.

**कुशब्द**– (पु.) **दुर्वचन**; कुशब्दाची ५८.

**कुशळ**– (वि.) **निपुण** ५६१, १३९०, १४६६; कुशल २८२७.

**कुशळता**– (भा.ना.) **कौशल्य, नैपुण्य** २७०६.

**कुश्चिळ**– (वि.) **वाईट**; कुश्चीळ १६८४; कुश्चळी २५१३; कुश्चळ २७१०.

**कुष्ठ**– (न.) **कोड** १२३४.

**कुष्ठवाणी**– (स्त्री.) **महारोग** २१११.

**कुसंग**– (पु.) **वाईट लोकांचा संग**; कुसंगे ३४०३.

**कुसर**– (स्त्री.) **कौशल्य**; कुसरी १९२, १८०३, २२५८.

**कुळ**– (न.) १) **घराणे** ११, ९२१, १३१९; कुळे २२, १४९०; कुळी ३४, १२६२; कुळा ३५२; कुळीची ४१९; कुळींचे ६४५; कुळांगना – (स्त्री.) **कुलीन स्त्री** २४६; कुळस्वामिनी – (स्त्री.) **कुलाची संरक्षक देवता** ४१३; कुळधर्म – **कुळाचार** १०२६, ४०४२; कुळधर्म १०२६; कुळहीन ११००; कुळपूज्य १३३३; कुळगोत्री – **कुळात व गोत्रात** २२३६; कुळदेवी २५७३; कुळीची देवता २६८६; कुळाचार ३३०६, ३७५५;
(वा.प्र.) **कुळी येणे** – कुलदेवता बनणे ४१७; **कुळाचा उच्चार करणे** – कुळाला शिव्या देणे ३९६६;
२) **पूर्वज**; कुळे – ८९३.

**कुळपणी**– (स्त्री.) **शेतजमीन सपाट करणे** ११४७.

**कुळवाडी**– (स्त्री.) **व्यवसाय, व्यापार** ७४, १९८२.

**कुळांकुड**– (न.) **वाईट प्रकारचे लाकुड** २५९२.

**कुळीक**– (स्त्री.) **अजीर्ण, मोडशी**; कुळिकेसी ३२१०.

**कूट**– (स्त्री.) **निंदा, कटुवचन** १९; कूट खाणे – **निंदा करणे** २८८०.

**कूप**– (पु.) **विहीर**; कूपा १३१; कूपी ११४८.

**कूर्म**– (न.) १) **कासव** ५७६, १५७१; कूर्मे ३०५४;
२) **दशावतारातील दुसरा अवतार**; कूर्म ४५४.

**कूर्मी**– (स्त्री.) **कासवी**; कूर्मीच्या ४२८२.

**कूस**– (स्त्री.) १) **पोट**; कुशी २४८६;
२) **गर्भाशय**; कुसी १५२२.

**कृतकृत्य**– (वि.) **कृतार्थ, समाधान** १५११, ४४४१.

**कृतांत**– (पु.) **यम** १२४८.

**कृत्रिम**– (वि.) **असत्य** ४०५२.

**कृपण**– (वि.) **कंजूष** ५०९, २६३४; कृपणा १५३१; कृपणे १७५८; कृपणाचे ४३७३.

**कृपणता**– (स्त्री.) **कंजूषपणा** ४३९५.

**कृपा**– (स्त्री.) **अनुग्रह, दया** ३३, ५१७, १३८२; कृपेचा ६११; कृपेचिये १६०८; कृपेविशी २६७५; कृपानिधी (वि.) २७८, ७५८, २२४४; कृपादान (न.) ४२८, १०२४, १७६६; कृपादृष्टी (स्त्री.) ४९५, २८८४; कृपाकरुणासिंधु (वि.) ६२७; कृपाअंतःकरणे (न.) ६७८; कृपासिंधु (वि.) ९४३; कृपादानी (वि.) ६७५, ४१५७; कृपासागरा (पु.) ३०९८; कृपापीयूषे (न.) ३६९०; कृपावचनाची (न.) ४२२८; कृपासिंधुराव (वि.) ४२३९.

**कृपावंत**– (वि.) **कृपाळू** ९४, १०७४; कृपावंते १४४, ४३३३.

**कृपाळु**– (वि.) **दयाळू** ४२४, ९३६; कृपाळुवा ६४६, २०४९; कृपाळूवे १२९२.

**कृष्ण**– (वि.ना.) **आठवा अवतार** ४३१३; कृष्णासि ५४; कृष्णा १४८; कृष्णाची ३८९; कृष्णाविण ४५२२; कृष्णभेटीची (स्त्री.) १४९; कृष्णकथा (स्त्री.) २५५, ३११३; कृष्णमिळणी – (स्त्री.) **कृष्णाशी एकरूपता** ३८९; कृष्णवेणुगीत (न.) ३९६; कृष्णलोकसृष्टी (स्त्री.) ६९७; **कृष्णनिर्मित सृष्टी** – कृष्णांजन (न.) ८४१; कृष्णरामनाम (न.) १५३२; कृष्णनाथा (पु.) १५७६; कृष्णध्याने (न.) १८३५; कृष्णनाम (न.) २०७३; कृष्णराम (पु.) ४४६३; कृष्णकामिनी (स्त्री.) ४५०७; कृष्णरता (स्त्री.) ४५०७; कृष्णरूपा (स्त्री.) ४५०७; कृष्णसुख (न.) ४५०७; कृष्णभोगावरी (पु.) ४५११; कृष्णार्पण (न.) **कृष्णाला अर्पण** ४५२१.

**कृष्णमणी**– (पु.) **कृष्ण नावाचा मणी** ९७.

**कृष्णमूर्ती**– (स्त्री.) **कृष्णाची मूर्ती** ३९६.

**कृष्णाजिन**– (न.) **हरणाचे कातडे** ४५४.

**कृष्णाबाई**– (स्त्री.) **कृष्णरूपी माता** ४४१२.

**कें ड**– (पु.) **कुत्र्याच्या ओरडण्याचा आवाज** १०५०.

**केंडणे**– (क्रि.) **त्रास देणे**; केंडावे ४०७८.

**केजे**– (न.) **विनिमय म्हणून द्यायचे धान्य**; केज्या २७३.

**केणे**– (न.) **माल** ८४८, १९५८, ३४५९; केण्यागुणे २९१६.

**केधवा**– (प्र.स.ना.) **केव्हा** ४१४, १९०९.



**केरपुंजा**– (पु.) **केराचा ढीग**.

**केरसुणी**– (स्त्री.) **झाडू** १७२४.

**केवडा**– (पु.) **एक सुगंधी झुडुप**; केवड्यामधील ४४७८.

**केव्हडे**– (प्र.स.ना.) **केवढे** १७२; केवढियें २००२ कितीतरी.

**केवा**– (पु.) **अडचण** ९६९.

**केविलवाणा**– (वि.) **दुःखमय** १२५४; किविलवाणी १३७६; किविलवाणे २५११; किविलवाणा ४२६०.

**केशर** – (न.) **एक सुगंधी पदार्थ** ४२७९.

**केशव**– (वि.ना.) **कृष्णाचे एक नाव** ६३५; केशवा २६६, १२४४, ३८२०; केशवाच्या १६५३; केशवाविण १४६३.

**केशवचैतन्य**– (वि.ना.) **तुकोबांचे परात्पर गुरू** ३६८.

**केशवदास**– (वि.ना.) **विठ्ठल वा कृष्ण** ४५०.

**केशीराज**– (वि.ना.) **विठ्ठल** ८७८, १०००; केशीराजा ६२७, ७३५, ७५०, ९७६, १२२०, १२५५, १७२६, १८०१, १९९६, ३११६, ३२८४, ३२९६, ३३०८, ४२८९; केशीराजे २५७८.

**केस**– (पु.) **केश** ७७६, २८१२;
(वा.प्र.) **केश फिरणे** – केस पांढरे होणे १७२५.

**केळ**– (न.) **एक फळ**; केळी २४५; ३५८५; केळे ४६४, ४०५५.

**केळवणे**– (क्रि.) **सुशोभित करणे**; केळवते १३२७.

**कैं** – (प्र.स.ना.) **केव्हा** ६, ८६८, २८१९.

**कैचें**– (प्र.स.ना.) **कोणते**; कइचा २०९; कैच्या २२३; कैची ४६०, २८८३; कैचे (वि.) – **क्षुद्र** १३०९; कैचा – **कसा** १५१६; कैसा – **कोठसा** १९९३.

**कैलास**– (वि.ना.) **कैलास पर्वत**; कैलासी १५७९.

**कैवल्य**– (न.) **मोक्ष** २०५३; कैवल्याच्या ९२९, ३८१७; कैवल्यनिधान (न.) ६३९; कैवल्यदातारा (पु.) १५७९; कैवल्यसागर (पु.) ४४८०.

**कैवाड**– (पु.) **कैवार**; कैवाडे ४७७, ८२३; कैवाडाच्या – **कैवार घेणाऱ्याच्या** २५८९; कइवाड ४५४६.

**कैवार**– (पु.) **बाजू घेणे**; कैवारे १८२१; कइवार १९९७.

**कैवारी**– (वि.) **पाठीराखा** ५४९, १०२३, ३१०१.

**कैसे**– (प्र.स.ना.) **कसे** १३८८; कैसी २८, १३५९; कैशा १७६; काशाला ५७२; कैशापरी ३८७; कैसेकैसे – **कसेकसे** ३७३६; काशानशी – **कशासाठी** २४२६.

**कोंडणी**– (स्त्री.) **बंदीवास** १५४२.

**कोंडणे**– (क्रि.) **बंद करून ठेवणे**; कोंडू १६७, २२३४; कोंडा ४०५; कोंडियेले ७९०; कोंडुनि १०९२; कोंडोनि २०६६; कोंडीन २५३२; कोंडकोंडुनि ८२८; कोंडमार (पु.) ४५०९; कोंडे – **कोंडीत सापडणे, अडचणीत सापडणे** ४५.

**कोंडा**– (पु.) **भूस** १७९६.

**कोंदण**– (न.) **दागिन्यावर रत्न जडविण्याचे घर**; कोंदणी ४७५, ४३७२; कोंदणे ९९७; कोंदणाची ३३८९.

**कोंदणे**– (क्रि.) **दाटी होणे**; कोंदली ३३१; कोंदलेसे ४२५; कोंदला २८८८.

**कोंदाटणे**– (क्रि.) **व्यापून राहणे, भरून राहणे**; कोंदाटले १८३०.

**कोंबडा**– (पु.) **एक पाळीव प्राणी**; कोंबड्याने १०४; कोंबड्याची २१४५; कोंबडे २२८७.

**कोंभ**– (पु.) **अंकुर** २८८६.

**कोकण**– (न.) **एक भूभाग** ४४८१.

**कोकिळा**– (स्त्री.) **एक पक्षीण** १६२१.

**कोटंबा**– (पु.) **वाघ्याजवळ असलेले लाकडी पात्र** ४६६.

**कोटि**– (सं.वि.) १) **एक संख्या** ६, ४७५; कोटीवरी ६८५; कोट्यानकोटी १४८८; कोटिकोटी ४४४३;
२) **विपुल**; कोटि ११४३; कोटिकुळांसहित (न.) १५७२, ३७४२; कोटिगोहत्यापातक (न.) ३११४; कोटिजन्म (पु.) ४३५०.

**कोठार**– (न.) **भांडार** ६६०.

**कोठे**– (न.) **घरटे** २५५०.

**कोठे**– (प्र.स.ना.) **कुठे** ४२, १३८५; कोठेही १२८७; कोठवरी ३६२, ४३६६.

**कोड**– (न.) १) **लाड, कौतुक** ३९, ६४३, ११५०; कोडे ८३१; कोडवाणी – **कौतुकाचे बोलणे** ४२०६;
२) **इच्छा**; कोड ३९१, ८८४, १३४२.

**कोडिया, कोढिया**– (वि.) **कोड नावाचा रोग झालेला**; कोडियाचे ४३७७; कोढियाचे ४११७.

**कोडिसवाणे**– (वि.) **गोजिरवाणे** ४२३८.

**कोडी**– (सं.वि.) **अगणित** ८६, १७८३.

**कोडे**– (न.) १) **कूट, समस्या** १४१, १७२, ८५७; कोडी १४६, ४२०, १४१९;
२) **आपत्ती**; कोडे ४७७, ७२४;
३) **प्रेम**; कोडे ६१४;
(वा.प्र.) **कोडे उगवणे** – संकटमुक्त करणे १०७४.

**कोण**– (प्र.स.ना.) १) **कोणी**; कोणी ११, १८०,

१३५९; कोणा २१३, १३७८, १४९७;
२) किती; कोण ६१;
३) काय; कोण ७२; कोणासाठी ६५; कोणासवे १२७१; कोणाजोगे १३२२; कोणासंगे २८८७.

**कोण**– (पु.) १) कोपरा; कोणी – कोपऱ्यातून १०८७;
२) बाजू; कोण २४८७.

**कोथळ**– (न.) आतडी २१९७; कोथळीस – पोटात २५६७.

**कोन**– (पु.) बाजू, कोपरा २६४९; कोनी ७९०.

**कोप**– (पु.) क्रोध, संताप १८५८, ४५०५;
(वा.प्र.) कोप धरणे – रागावणे ५४३.

**कोपट**– (न.) झोपडी १८०६, २५३७.

**कोपणे**– (क्रि.) रागावणे; कोपे ५५, ८३४; कोपतील ३९५; कोपोनिया ४०६; कोपलासी ६७४; कोपलिया ४५५८.

**कोपर**– (पु.) १) राग ३५६१;
२) हाताचे कोपर; कोपरा १६३.

**कोपी**– (स्त्री.) झोपडी १४८६.

**कोपीन**– (स्त्री.) लंगोटी ३९४०.

**कोम**– (पु.) कोंभ, अंकुर; कोमा २६०५.

**कोमळ**– (वि.) मऊ, मृदू ३८७, १६९५; कोमल्या ५७२.

**कोमाइणे**– (क्रि.) कोमेजणे, सुकणे; कोमाइली ४५४५.

**कोमेजणे**– (क्रि.) सुकून जाणे, म्लान होणे; कोमेजलो ३५७६ .

**कोरणे**– (क्रि.) १) कोरीव काम करणे; कोरोनि २८५६
२) खणणे; कोरोनिया ३८६६.

**कोरडे**– (वि.) १) शुष्क, तेल न घातलेले; कोरडी १८३३; कोरड्या २८१९;
२) निरर्थक; कोरडाचि ८०४; कोरड्या ९६३, १४१२; कोरडे १२६३; कोरडी ३४९२;
३) न शिजलेले, कोरान्न; कोरडे १४१६;
४) कोरा; कोरडा १७२८;
५) भावशून्य; कोरडिया २४४४;
(वा.प्र.) कोरडे ठेवणे – ज्ञानरहित होणे २३१४.

**कोरान्न**– (न.) कोरडी भिक्षा २७०.

**कोलणे**– (क्रि.) विटी गलीवरून दांडूने उडवणे; कोली २०१.

**कोलित**– (न.) पेटलेली लहान काडी ३४२१.

**कोल्हा**– (पु.) एक पशू; कोल्हे २५१२, ४१९१; कोल्ह्यांचे ४४५५.

**कोल्हाटा**– (पु.) कोल्हाट्याचा खेळ; कोल्हाटासी ४१६४.

**कोल्हाटिणी**– (स्त्री.) कोल्हाट्याची बायको ४१९०.

**कोल्हाळ**– (पु.) १) कोलाहल, गोंधळ, गोंगाट २३७, १३६२, २८२४;
२) मनातील आंदोलन; कोल्हाळ १२७५;
३) नामाचा गरज; कोल्हाळ १३२२;
४) आक्रोश; कोल्हाळ ३३५३.

**कोवसा**– (पु.) आधार ६०७, २४५३.

**कोवळा**– (वि.) मृदू, कोमल ६११, ६३३, ९९१, ३४४३; कोवळे १०५९; कोवळी १११८.

**कोष्टी**– (वि.) विणकऱ्यांची एक जात ५८४.

**कोसपेणी**– (पु.) दोन मैलानंतरचा मुक्काम १७००.

**कोसेरा**– (पु.) कोळी किडा २०४९.

**कोळसा**– (पु.) विझलेला विस्तव; कोळसे २४८.

**कोळी**– (स्त्री.) १) मासे पकडणाऱ्यांची जात; कोळिया ३१०७;
२) वाल्मीकी; कोळियाची १४५५; कोळी २१२१.

**कौतुक**– (न.) आनंद, लाड २२, ५६४, १३५७; कौतुके ४९, ४००, ८०४; कौतुकासी १३२७; कौतुकाचे १३३२; कौतुकाची १३६२; कौतुकावाचूनि १३८९; कवतुक १४८, ९१९, १५६८; कवतुके ५१४, ८४३; कवतुकणे १८१८; कवतुक वेव्हार (पु.) २१२९; कवतुक उत्तरे (न.) ३७६२ ६७६२.

**कौपीन**– (स्त्री.) छाटी, लंगोटी १४८५.

**कौरव**– (न.) कुरूचे वंशज २२१९; कौरवांची १५५७; कौरवीं १७८४.

**कौल**– (पु.) आश्वासन; नकाराचा संकेत २६२२.

**कौसल्या**– (वि.ना.) राममाता; दशरथाची पत्नी ११०४.

**कौस्तुभ**– (वि.ना.) एक मणी ६; कौस्तुभमणि २.

**क्रमिणे**– (क्रि.) मरणे १३३३.

**क्रियमाण**– (न.) चालू घडीचे कर्म २९४, ९१३, १७६२.

**क्रिया**– (स्त्री.) १) कृत्य ४८२, १२६७; क्रियाहीन (वि.) २४६; क्रियामतिहीन (वि.) ७६४; क्रियानष्ट (वि.); क्रियाहीन (वि.) ९५६, ३५७४, ४३९५;
२) निष्क्रिय (वि.); क्रियानष्टे. १२७२; क्रियानष्टा २८१४.

**क्रीडणे**– (क्रि.) खेळणे; क्रीडाया ३५४; क्रीडतील ३९३; क्रीडो २१०८; क्रीडतो ३१०७.



**क्रीडा**– (स्त्री.) खेळ ४१२, ५६४, १७७१; क्रीडेसी ३२१३; क्रीडास्थळ (न.) १५७९; क्रीडाकल्लोळ (पु.) ४०३२.

**क्रोध**– (पु.) राग, संताप ९०, ७९४; क्रोधा ३५६; क्रोधासी ३०६३; क्रोधरूपे ७९१.

**क्लेश**– (न.) दुःख, वेदना ५८६, १८५३; क्लेशीं ४२०२; क्लेशेसी २८०४; क्लेशाचा ३१७३; क्लेशाची ४१०४.

## ख

**खंड**– (पु.) १) जमिनीच्या मालकाला करारानुसार द्यावयाची रोख रक्कम वा धान्य २०६१, ९७२;
२) निवाडा; खंडावरी २९४७, ३६६०.

**खंड**– (पु.) १) तुटणे, थांबणे, भंग, ताटातूट ३६७६;
२) भाग; खंडे १४८५; खंडदंडे – (पु.) शिक्षेत खंड पडणे ३४८४.

**खंडण**– (न.) १) थांबणे १८९४;
२) निराकरण; खंडण २१३६.

**खंडणा**– (स्त्री.) खंड, भंग ४२३, ६०५; खंडणेची ८८८.

**खंडणे**– (क्रि.) १) नाहीसे होणे; खंडईल ६१९; खंडी ६५७; खंडियेला ३२०६; खंडावा ३३७४; खंडू संपवू ९४१; खंडे १३५६; खंडोनि १५३४; खंडले २६४९;
२) सोडणे; खंडिली १३०५;
३) बंद करणे; खंडोनि २९१२.

**खंडन, खंडण**– (न.) १) नाश; खंडन ४७, ३८४; खंडण ४८१, २१३८; खंडणा ९९७, १३९३;
२) ताटातूट; खंडण १९१९.

**खंडी**– (स्त्री.) धान्य मोजण्याचे परिमाण (२० मण) २२७४.

**खंडेराव**– (वि.ना.) खंडोबा २३८४.

**खंत**– (स्त्री.) काळजी, मनाला लावून घेणे, झुरणे; खंती ४७, ८९७, १५११; खंतीवेगळे २५३३;
(वा.प्र.) खंती धरणे – मनातल्या मनात झुरणे.

**खचणे**– (क्रि.) कोलमडणे; खचते ६३४; खचविले २३१३; खेचेसी ३५१४.

**खटखट**– (स्त्री.) त्रास २६६१.

**खटपट**– (स्त्री.) प्रयत्न १३१६, १६७६; खटपटा ९४९; खटपटे १६५५, ३४८०.

**खटाटोप**– (पु.) नसता उद्योग; **खटाटोपी** ४०४९.
**खट्या** (वि.) तापदायक ३१७४.

**खट्याळ**– (वि.) खोडकर; खट्याळसे १०६

**खडक**– (पु.) मोठा दगड; खडकी १४८, २२९०; खडकाचे १४००.

**खडतर**– (वि.) भयानक ४१९.

**खडबड**– (वि.) जाडेभरडे ३९०.

**खडबडणे**– (क्रि.) १) खडखड असा आवाज होणे; खडबडे २५०;
२) सावध होणे; खडबडे ३३०७.

**खडा**– (पु.) १) दगडाचा लहान तुकडा; खडे ५२२, २१३७, ४५०५; खड्या ऐसा ४५४;
२) रत्न; खडा १७९७; खडे २०४७;
३) खडीसाखरेचा खडा; खडा १९९२;
(वा.प्र.) खडे रिचवणे – कठीण गोष्टी पचविणे ५८५.

**खडी**– (स्त्री.) एक खेळ ३०८१.

**खड्ग**– (न.) तरवार; खड्गाची ४४९१.

**खणखणा**– ध्वन्यनुकारी शब्द ३०९२.

**खणणे**– (क्रि.) उकरणे, खोदणे; खणी १४८०.

**खत**– (न.) १) जखम; खतावरी २७११;
२) करारपत्र; खती २४१०.

**खताविणे**– (क्रि.) रोजकिर्दीमधील नोदींची वर्गवारी करणे; खताविला २४०९.

**खतेला**– (वि.) डागळलेला ४२१०.

**खदखदा**– (क्रि.वि.) नादशब्द १४८.

**खद्योत**– (पु.) काजवा ४४८१; खद्योते २३३९, ३७७२.

**खपुष्प**– (न.) एक काल्पनिक आकाशपुष्प ४२६४.

**खर**– (न.) गाढव; ११२७; खरा १२१, १७१५; खरासि २५८; खराहूनि २७०७.

**खरकटे**– (न.) उष्टे ४४८४.

**खरजुला**– (वि.) खरूज झालेली व्यक्ती ३८२३.

**खरा**– (वि.) १) सत्य ४५, ५०, १०६८; खरे ६१, ७११, ३२६०; खरेचि ४३७; खरेपण ५३४; खऱ्याचा ८३४; खरियाचे ९४६; खऱ्याचें ३२६०; खऱ्याखोट्या (न.) १६८९;
२) कल्याण; खरे १५२;
३) मनापासून, निश्चित; खराड १५४.

**खरारा**– (पु.) घोड्याला स्वच्छ करणे ३०६२.

**खर्ग**– (न.) तलवार; खर्गे ३०९२; खर्गधार (स्त्री.) ४२६३.

**खर्चणे**– (क्रि.) खर्च करणे; खर्चिला ५१८; खर्ची ४२९६.

**खलेती**– (स्त्री.) कागदपत्रांची लहान पिशवी ४३५६.

**खवंद**– (स्त्री.) जखम; खवंदासी ४२२५.

**खवखव**– (स्त्री.) कटकट ३७६७.
**खवळणे**– (क्रि.) १) रागावणे; खवळली ५६८; खवळे २२०३;
२) चेतविणे; खवळिले २२४८.
**खळ**– (वि.) १) दुष्ट, दुर्जन ७७, ३१२, १३४५; खळा ११९, ८१५, १०५६; खळी ३०८; खळाचे ८३६;
२) हट्ट; खळे २५७३.
**खळखळ**– (स्त्री.) १) उथळपणा २५५;
२) कटकट; खळखळ २२११.
**खळवादी**– (वि.) हट्टी १४६४, ४५०५.
**खळाळ**– (पु.) लोंढा, प्रवाह; खळाळी ६३४.
**खळे**– (न.) शेतातील धान्य मळण्याचे ठिकाण ११४९.
**खळेदाणी**– (वि.) खळ्यावर बसून वाटप करणारा १३४०.
**खांजनी**– (स्त्री.) भरती ७०७.
**खांड**– (न.) सुपारीचा तुकडा ६८३, ४२९६.
**खांदा**– (पु.) शरीराचा एक भाग १४७, २५८०; खांदी १९९, १३६८, ४२१३; खांद्या ३०७५; खांद्यावरी १६५, ४२३५.
(वा.प्र.) खांदा वाहणे– डोक्यावर घेणे १३२२.
**खांदी**– (स्त्री.) झाडाची फांदी; खांदी ३८५; खांदीवरी ४५४२.
**खांब**– (पु.) तुळईला दिला जाणारा लाकडी आधार; खांबी ३९१; खांबावरी ३०९५.
**खांबसूत्री**– (पु.) कळसूत्री बाहुल्यांचे खेळ करणारा ३२३०.
**खाई**– (स्त्री.) आग २६७०.
**खाट**– (स्त्री.) दोऱ्यांनी विणलेली बाज; खाटे २९५२; खाटेवरी २०४१.
**खाटिक**– (पु.) कसाई ९४; खाटिकाचे ४३५१.
**खाण**– (स्त्री.) १) दगड, धातू, कोळसा इ. जमिनीतील वस्तू बाहेर काढण्यासाठी खणलेली जागा; खाणी २८७, १३२९;
२) जन्म; खाणी ६५७, ११४३;
३) साठा; खाणी ६९३, ३३७१;
४) तोटा; खाण ३२८९; खाणीबाणी – (स्त्री.) खाणीत व शब्दात ४८८९;
(वा.प्र.) खाण पडणे – सर्व गोष्टींचा त्याग करणे २६८९.
**खाणखुण**– (स्त्री.) खाणाखुणा २७२.
**खाणणे**– (क्रि.) खणणे, उकरणे; खाणोनि १४३६.
**खाणे**– (क्रि.) १) भोजन करणे; खातो ५६; खाय ५९, ३८८; खाऊं ६४, ११४९; खातां ९८, २४९; खावे १४४, ८३२; खादडे १४८, १२१८; खा १७४; खाऊन १७५; खाई १९८; खावया ४७०; खाणार ८०३;
२) दातावर दात आपटणे; खातो ८६;
३) गिळून टाकणे; खादली १२९;
४) ग्रासणे; खावे २४३८;
५) संपविणे; खाणे ३१९०.
**खाणोरी**– (वि.) खादाड ५६८, २६७७.
**खातडवासी**– (वि.) उकिरड्यावर राहणारा ३६७८.
**खात्या**– (वि.) खाणारा ८००.
**खान**– (स्त्री.) १) चोरी ४३७; खाने १७५८;
२) दरोडा; खाने १२१८.
**खान**– (वि.) ओस;
(वा.प्र.) खान पडणे – ओस पडणे ४३५२.
**खाना**– (पु.) कप्पा, खण; खाने १०८९.
**खापर**– (न.) गाडग्याचा तुकडा १५३३; खापराचे ३००; खापरा ५७३; खापरी ६५४, १९२०; खापरखुंटी – (स्त्री.) खापराचा तुकडा २१९५.
**खाली**– (वि.) अधःपतन, अधोगती १५४; खालता २४८०; खाले ४२४४.
**खाली**– (क्रि.वि.) पृथ्वीवर ८८९.
**खास**– (वि.) विशेषे करून ४४८३.
**खासा**– (पु.) कसा, कमरेवर बांधायची पैशाची पिशवी ४५३.
**खिंडोर**– (न.) खिंडार, भिंतीला पडलेले भगदाड; खिंडोरीं ४४४६.
**खिचडा**– (स्त्री.) खाद्यपदार्थ २३०.
**खिचडी**– (स्त्री.) एक खाद्यपदार्थ ३९२२.
**खिजणे**– (क्रि.) ओशाळणे; खिजे ८३५.
**खिस्ती**– (वि.) सावकार; खिस्तीचा ३९२१.
**खिळ**– (वि.) बंदिस्त; खीळ ८०३.
**खिळणे**– (क्रि.) अडकवून ठेवणे, बंदिस्त करणे; खिळिले ४३९४;
(वा.प्र.) खिळणी पडणे – बंद होणे ३५५६.
**खीर**– (स्त्री.) दुधाचे एक पक्वान्न ३५८५.
**खीरम्या**– (पु.) उंची वस्त्र ३९०७.
**खुंट**– (पु.) ठिकाण; खुंट (चारी) चार धाम ८५८.
**खुंट**– (पु.) १) झाडाचा बुंधा १८४९;
२) लाकडाचे दांडके; खुंटा ३६११;
३) बुद्धिहीन; खुंट १७८१.
४) ज्वारी कापल्यावर जमिनीवर शिल्लक राहिलेला



भाग; खुंट ३३६१.
**खुंटणे**– (क्रि.) १) थांबणे; खुंटतील ३८; खुंटे १०९, १४५९; खुंटले ३७०, ११०६; खुंटलीसी ३९२; खुंटू ४३५; खुंटलिया ६२६, १३२८; खुंटला ६४८; खुंटावा १२१६;
२) पकडणे; खुंटोनिया २८०२;
३) संपणे; खुंटईल ३४५१;
(वा.प्र.) खुंटी येणे – जन्ममृत्यू संपणे १८१६.
**खुंटी**– (स्त्री.) मेरख १७०२;
(वा.प्र.) खुंटी काना घालणे – कानात खुंटी ठोकणे, शिक्षा करणे २०३७.
**खुडा**– (वि.) वाकड्या पायचा १४८.
**खुणावणे**– (क्रि.) खुणेने बोलावणे; खुणाविती ३९३.
**खुर**– (पु.) काही जनावरांच्या पावलांचा पुढचा भाग ११६.
**खुरपणे**– (क्रि.) मुख्य पिकातील गवत काढणे; खुरपू २८२०.
**खुलणे**– (कि.) रंगून जाणे, आनंदित होणे; खुले ९९१.
**खूण**– (स्त्री.) १) संकेत चिन्ह ४५, ८२३; खुणा ११६, १३७८; खुणे ७०८;
२) वैशिष्ट्य; खुणे ७३५;
३) रहस्य; खुण ७४८, ३३८६;
४) इच्छा; खुणे ८६९;
५) खून, घात; खुण १२१८.
**खेचर**– (पु.) आकाशात फिरणारा, भूत पिशाच्च इ. ४१५, ४५३३.
**खेटणे**– (क्रि.) खेटून जाणे; खेटी २३५५, ४२९५;
(वा.प्र.) खेट करणे – भेट घेणे ४५०७.
**खेटर**– (न.) पादत्राण;
(वा.प्र.) खेटर तोडणे – निंदा सहन करणे २२१७.
**खेटी**– (स्त्री.) लगट ३२९७.
**खेद**– (पु.) दुःख ४२५; खेदी ३२६२; खेदा ४०४९; खेदक्षीण (वि.) २०७१.
**खेप**– (स्त्री.) १) खेटा; खेपा ३८, ११३९, २२९९;
२) जन्मात, आयुष्यात; खेपे ६४४, १७४९;
३) जन्ममृत्यूची खेप; खेप ३७५२;
४) यात्रा; खेपा ४३८४;
(वा.प्र.) खेपा खुंटणे – येरझारा संपणे ३८९; खेपा खंडणे – येरझारा संपणे ९४१.
**खेवणे**– (क्रि.) भिणणे २०७३.
**खेळ**– (पु.) क्रीडा १८९, १७७२; खेळा १३२१; खेळापरी २४११; खेळेसाटी २९८७.
**खेळकर**– (वि.) परमार्थप्रवण १९०.
**खेळणा**– (पु.) खेळणे २४८७.
**खेळणे**– (कि.) खेळणे; खेळावे १४०; खेळता १५३, १२५९; खेळे १७१, १४५४; खेळोनिया १९०; खेळती ३००; खेळो ३९३, १३३०; खेळतोसे ३९३; खेळतसां ९६७; खळविसी १२७५; २) दिसणे; खेळे ३२१;
(वा.प्र.) खेळ मांडणे – खेळ खेळणे ३६५, ५६४.
**खेळिया**– (पु.) खेळणारा १७१, १९०; खेळतियामधी २००४.
**खेळीमेळी**– (स्त्री.) आनंदाने १४८, १९७७.
**खैर**– (पु.) एक वृक्ष; खैराचे ८०५.
**खोकर**– (वि.) पडका, जीर्ण; खोकर फुटके मडके ४०५९.
**खोकला**– (पु.) खोकला ३०८३.
**खोचणे** – (क्रि.) १) टोचणे;
२) खजिल होणे; खोचे १७५४;
३) संकट वाटणे; खोचलासी २८८१;
४) भेदणे; खोचते ४२६३.
**खोटा**– (वि.) १) असत्य, लबाड ६३, ३१६, १८०१; खोट्यांचा ६६, ४५०; खोटे ९३, १४०१, २००९; खोटियाचे ९९, ४१०३; खोट्या ८३४; खोट्याने ९६५;
२) सोंग आविर्भाव; खोटा १४४;
३) निरर्थक, निष्फळ; खोटी ९३, ९५२;
४) वाईट; खोटी १६५५;
५) तोटा; खोटा १७०९;
६) अपवित्र; खोटे ४४१०.
**खोटेपण**– (न.) खोटेपणा; खोटेपणे १[illegible]६७.
**खोड**– (न.) झाडाचे खोड; खोडा ४२८.
**खोड**– (स्त्री.) १) सवड; खोडी १६७, ११११४, ४०४४;
(वा.प्र.) खोडी धरणे – खोडी करणे ३७९;
२) चूक, उणीव; खोडी २१३४.
**खोडणे**– (क्रि.) तोडणे; खोड २५५;
२) खरवडून काढणे; खोडिता २५६;
३) संपणे; खोडे ३६७५;
४) दूषित होणे; खोडी ४०५०.
**खोडा**– (पु.) (जन्ममृत्यूचा) सापळा; १२७, १२९३, ३१८३; खोड्या २३१३;
(वा.प्र.) खोडा घालणे – सापळ्यात अडकणे १७८६.
**खोडावणे**– (क्रि.) लुळा पांगळा होऊन पडणे;

खोडावली ४०७०.

**खोडी**– (स्त्री.) **अवगुण** ५८३, २३९४.

**खोदु**– (वि.ना.) **एक हिजडा भक्त** ४३९९.

**खोप**– (स्त्री.) **झोपडी**; खोपा २४७६.

**खोबरे**– (न.) **खोबरे** ३०८३.

**खोरे**– (न.) **माती ओढण्याचे लोखंडाचे साधन** ११४०.

**खोल**– (वि.) १) **खोल**; खोले ७३९; खोली १८९४;
२) **दुर्लभ**; खोल ६२२;
३) **गंभीर**; खोल २३१२;
४) **अवघड**; खोल २३९१.

**खोली**– (स्त्री.) **गांभीर्य** २३३३.

**खोवणे**– (क्रि.) **खोचणे, अडकवणे**; खोवी ७८८.

**खोळंबणे**– (क्रि.) **वाट पाहात थांबणे**; खोळंबले ४०५, २१२७; खोळंबला २३८०, ३५४८.

**खोळंबा**– (पु.) १) **उभा राहणारा** १८६५;
२) **अडवणूक**; खोळंबा ३७८१, ४४००.

**खोळ**– (स्त्री.) १) **गर्भ**; खोळे १११; खोळी ४२७; खोळेमधी ३४२१;
२) **आवरण**; खोळ १९६, १८८२; खोळे १५०६; खोल ६२१.

**ख्याति**– (स्त्री.) **प्रसिद्धी** ३४८; १५४३, ४०४९.

**ख्याल**– (पु.) **खेळ** ३९४.

## ग

**गंगा**– (वि.ना.) **पवित्र नदी** १३७, ४५४; गंगे २४५, १४५६, ३७७८; गंगेचिया ८८४; गंगाजळ (न.) ६२, १८३०, ३५५२; गंगाओघ (पु.) २५७, ३५५४; गंगास्नाना (न.) ३६८; गंगातीर (न.) ७८९; गंगासागरसंगमी (पु.) १५३१; गंगोदके (न.) ३७७८; गंगाचरणी (न.) ४५०६.

**गंध**– (न.) **कपाळावर लावायचा टिळा** १२५.

**गंध**– (पु.) **सुवास**; गंधाचा १७२९.

**गंधर्व**– (पु.) **स्वर्गातील गायक**; २५७; गंधर्वांचे १९८८.

**गंधर्वनगर**– (न.) **ढगांच्या आकृती**; गंधर्वनगरी ४२६४.

**गंधी**– (स्त्री.) **दुर्गंधी** ११७.

**गंभीर**– (वि.) **विवेकी, विचारी** ३६०४.

**गगन**– (न.) **आकाश** १७९६; गगनाचा २६८५; गगनी २०४९; गगनभरी २१३.

**गज**– (पु.) **हत्ती**; गजाची ७९७; गजाचिया २५५०; गजाचे ३३१५; गजाहूनि १५६६; गजालागी ३८३१.

**गजर**– (पु.) **नाद, घोष** ३३२, १५७५; गजरे १५८, ११०६;
(वा.प्र.) **गजर उठणे** – मोठा घोष होणे ३८८, ४१५.

**गजानन**– (वि.ना.) **गणपती**; गजानन महाराजा ४३५८.

**गजेंद्र**– (पु.) **भक्त असलेला हत्ती**; ३०५४, ३०८७; गजेंद्राचा १७८४; गजइंद्र २४५५; गजेंद्रा-कारणे ४१६६; गजेंद्ररक्षका (पु.) ६७३; गजेंद्रपशु (पु.) १०२३.

**गटगटा**– ध्वन्यनुकारी शब्द ४२३८.

**गड**– (पु.) **किल्ला** २४५२.

**गडगडी**– ध्वन्यनुकारी शब्द ३०८३.

**गडणी**– (स्त्री.) **सखी, मैत्रीण**; २७, ४४९५.

**गडबडणे**– (क्रि.) **थडथड वाजणे**; गडबडल्या ३४२३.

**गडसंदी**– (स्त्री.) १) **अडचण**; गडसंदीचा ३१९१, ३७०२;
२) **सोईची जागा**; गडसंदी ३६१९.

**गडी**– (पु.) **सवंगडी, सोबती** १४७, १५५, १२९०; गडिया १४५; गडे १६३; गड्यांनी १६५; गडियांचा १६७.

**गडू**– (पु.) **पाण्याचे लहान भांडे**; गडवे १२८५.

**गण**– (पु.) **समुदाय** ३१७.

**गणगोत**– (न.) **आप्तइष्ट** २९०२, ४४३७.

**गणणे**– (क्रि.) **मोजदाद करणे**; गणा १५८०; गणी १९६५.

**गणती**– (स्त्री.) **मोजदाद** १०६९.

**गणना**– (स्त्री.) **मोजदाद** १४६७.

**गणपती**– (वि.ना.) **गणपती** १५८०; गणपतीसि २८८३.

**गणिका**– (स्त्री.) **पिंगला वेश्या** २५७, ३८६, १४३९; गणिकेचा २०७०; गणिकेच्या ३९६९.

**गणित**– (न.) **हिशोब** ६६२.

**गणेश**– (वि.ना.) **गणपती** ४४५८; गणोबा २३८४.

**गति–गती**– (स्त्री.) १) **दिशा, मार्ग** २३, ९४४, १७५६, ३९२१;
२) **अवस्था**, स्थिती; गती ३०, ७२५, ४०८३;
३) **आयुष्याची अखेर**; गति ७२;
४) **अधोगती**; गति १३३;
५) **सद्गती**; गति २९१, १०२७, ११२३;
६) **पात्रता**; गति ३३२;
७) **प्रयत्न**; गती ३९२;



८) **कल्याण**; गति ८१९;
९) **वागणूक**, रीत; गति १५७०;
१०) **पुण्य**; गति २८६५.

**गदा**– (स्त्री.) १) **एक शस्त्र** ११५, १८७७, २३६०;
२) **भिक्षा**; गदा ७९३.

**गदाधर**– (वि.) **गदाधारी विष्णू** ६३५.

**गदारोळ–ळी**– (स्त्री.) **आरडाओरडा**; गदारोळे २५७४; गदारोळ ३२३९, ४२८३; गदारोळी ८६१, १९७७.

**गद्य**– (न.) **गद्यग्रंथ**; गद्ये ९८९.

**गधडा, गधडी**– (वि.) **मूर्ख**; **गधडा** ७९१; गधडी १०७, २४१४.

**गबाळ**– (न.) १) **गाठोडे** ८८४;
२) **अडाणी**; गबाळ (वि.) ३१८; गबाळा (वि.) २७२;
३) **केरकचरा**; (इथे लक्षणेने असत्य असा अर्थ होतो.); गबाळाची ३६७५.

**गभस्ती**– (पु.) **सूर्य** १५९६.

**गमणे**– (क्रि.) १) **करमणे**; गमे ८; गमेसे १९१३;
२) **घालविणे**; गमा ४०३६.

**गमन**– (न.) १) **निद्यंकृत्य** २७४;
२) **येणे जाणे**; गमनी ५९२;
३) **भ्रमंती**; गमन १४५५.

**गमावणे**– (क्रि.) **घालवणे**; गमावी १३९; गमाविल्या १७७; गमाउनियां २३६; गमाविले १०५४, २२५४; गमाविली १८७७; गमाविती ४५०१.

**गम्य**– (वि.) **समजणारे** २४७७.

**गया**– (वि.ना.) **तीर्थक्षेत्र** ३३१, १७३४; गयेहुनी ४०४७.

**गयावर्जन**– (न.) **गयेत करायचे धार्मिक विधी** १६५८, ४१६३.

**गयावळ**– (स्त्री.) **गयेतील उपाध्ये** ४२०५.

**गयाळ**– (वि.) **गबाळा**; गयाळाचे २२२०; गयाळी ३०८२.

**गरज**– (स्त्री.) **आवश्यकता** ४३११.

**गरजू**– (पु.) **गरजवंत**; गरज्याची १३७१; गरज्या २२११.

**गरती**– (स्त्री.) **कुलीन स्त्री**; गरतिचि ४५८.

**गरळ**– (न.) **विष** १७५८.

**गरुड**– (वि.ना.) **विष्णूचे वाहन असलेला पक्षी** १३०; गरुडाचे ६, १५३७; गरुडा ३८७; गरुडासहित १५५१.

**गरुडटका**– (पु.) **झेंड्याच्या टोकावर असलेले गरुडाचे चिन्ह**; गरुडटके ३३०, १९४९; गरुडटक्यांच्या ८७२, २२५२; गरुडटक्यां १५७५.

**गरुडध्वज**– (वि. ना.) **विष्णू**; गरुडध्वजा ६४२, १५७१, २४५३.

**गरुडपार**– (पु.) **पंढरपूरच्या विठ्ठल मंदिरातील गरुड खांब**; गरुडपारावरी ५; गरुडपारी ४३८३.

**गरुडासन**– (पु.) गरुडरूपी आसन २६०५.

**गर्जणे**– (क्रि.) **गर्जना करणे**; गर्जतसे ३३, ३७२१; गर्जताती ५३; गर्जती १९५, १४३९; २७६५; गर्जो ४५०; गर्जे ५९१, ३०९१, ४३३०; गर्जवूं ६३५; गर्जइल ६४४; गर्जतील २६४६; गर्जईन ३६०१.

**गर्जना**– (स्त्री.) **मोठा आवाज** २७८३.

**गर्धब**– (न.) **गाढव**; गर्धबासी ४२७९.

**गर्भ**– (पु.) **गर्भ** १६, ७५, ४५०४; गर्भाचे ३५२; गर्भीच्या ६१५; गर्भी ६५४, २०४९; गर्भा ३२७६; गर्भादियोनि १०९९;
(वा.प्र.) **गर्भ धरणे** – जन्मास येणे १६.

**गर्भआंधळा**– (वि.) **गर्भात असताना आंधळा बनून राहणे** ४२७.

**गर्भवास**– (पु.) **गर्भवास** ५७, १०७३, ३०५९; गर्भवासा ३६२, ६५१; गर्भीवास ६२८, ९४५; गर्भवासदुःखे ५४२; गर्भवासयातना २१०६.

**गर्भिणपणे**– (भा.ना.) **गरोदर** ३७५.

**गर्व**– (पु.) **अहंकार** २९२, १०५२; गर्वा २५९; गर्वे ३३६४; गर्वमूळ – **गर्वाचे कारण** ३०८१;
(वा.प्र.) **गर्व मोडणे** – गर्व सोडणे ६४१; **सर्व हरणे** – गर्व नाहीसा करणे २५००.

**गर्वशिरोमणी**– (वि.) **गर्विष्ठ** ४२१०.

**गर्वनिधि**– (वि.) **गर्विष्ठ** ४५४८.

**गऱ्हवार**– (वि.) **गरोदर स्त्री**; गऱ्हवारे २३७६.

**गलितकुष्ट**– (न.) **रक्तपिती** ४३६६.

**गवशी**– (वि.) **सापडून देणारा** ६९२.

**गवसणी**– (स्त्री.) **व्यापणे, वेढणे** ७८४.

**गवसणे**– (क्रि.) **सापडणे**; गवसिलो २७१९.

**गवांदी**– (स्त्री.) **अन्नछत्र** २३४०.

**गवाळ**– (न.) **गाठोडे**; गवाळे ७८८.

**गवाक्ष**– (न.) **रानरेड्याचे शिंग** ४५४.

**गव्हर**– (न.) **रहस्य, मर्म** ३१५, ११४२.

**गव्हाण–न**– (स्त्री.) **गुरांना चारा घालण्याची जागा**; गव्हाने ४२३.

**गव्हाणे**– (न.) **पांगळ्याच्या हातातील काठी** १९८२.

**गव्हार**– (वि.) **मूर्ख** ६२७, २११३; गव्हारे ९१९;

गव्हारा ३०६६; गव्हाराचे ४२२३.

**गहन**– (वि.) १) **थोर, श्रेष्ठ** २८४;
२) **गूढ**; गहन २०४१.

**गहिला**– (वि.) **मूर्ख, अडाणी** २५०७.

**गहिवर**– (पु.) **उमाळा**; गहिवरे ४२५२.

**गहू**– (पु.) **एक धान्य** ३६, ३२५; गव्हांचिया ७०; गव्हांचे २४२७, ३१३३; गव्हा ४०७३; गव्हांच्या ४४५१.

**गळ**– (पु.) **मासा पकडण्याचे साधन** ६८८; गळी १०९२, ३४९०.

**गळणे**– (क्रि.) १) **गळून पडणे**; गळेचिना ७५; गळताती ७८८; गळती १२९०; गळोनिया १७८२;
२) **झाकले जाणे**; गळोनि ३६;
३) **नाहीसा होणे**; गळे २४७८;
४) **वाहणे**; गळती २९६६; गळतसे ३०८३; गळे ४४६२.

**गळा**– (पु.) **कंठ, नरडे** ५४; गळा २१३७५, १०५६, ३०५०; गळ्या २४०;
(वा.प्र.) **गळामिठी दिधणे** – गळ्याला मिठी मारणे ३७५; **गळा बांधणे** – गुंतून पडणे ४१२, १९८६; **गळा घालणे** – अंगावर वस्त्र टाकणे ४५५; **गळा पायी बांधणे** – पायावर डोके ठेवणे ९७१; **गळा पडणे** – बळेच मागे लागणे ९७२, १०८४; **गळा उगवणे** – अडचणीतून सोडविणे ९७२.

**गळित**– (वि.) १) **थकलेला**; गळित ४७३, २६२१;
२) **टाकणे, त्याग करणे**; गळित ७२१.

**गांजणे**– (क्रि.) **पीडला जाणे**; गांजियलो २३४; गांजले ३४७; गांजियेले १७३७; गांजी १७४२; गांजो २२५५; गांजूं ३२६७; गांजिला ३४१६; गांजिता ४४७७.

**गांजला**– (वि.) **पीडलेला, त्रासलेला**; गांजलियाचे १०३२.

**गांजिबा**– (स्त्री.) **फळे इ. नेण्याची जाळी** २३८७, ४३८५.

**गांड**– (स्त्री.) १) **गांड**; गांडीची ९८७, २६६०;
(वा.प्र.) **गांड फाटणे** – अनिवार दुःख होणे १२१२;
२) **गुदद्वार**; गांड ४४६१.

**गांडमणी**– (पु.) **गुह्यगोष्ट** १००३.

**गांढा**– (वि.) **अडाणी** १७१, ६५८; गांढे १६८३; गांढ्या १३९; २३१२; गांढ्या भित्रा १७२०; गांढ्याळ १८६३.

**गांढेपण**– (न.) **दुबळेपण** ३१६०, ३१२९.

**गांदणे**– (क्रि.) **मलिन होणे**; गांदले ९३४.

**गांधेल**– (स्त्री.) **गांधील माशी**; गांधेलांचे ४३२३.

**गा**– (संबो.) ३७, ४३३.

**गाजणे**– (क्रि.) १) **गाजावाजा होणे**; गाजतसे ७३; गाजे २३५०;
२) **कोलाहल होणे**; गाजे १२८०.

**गाजर**– (न.) **एक कंदमूळ**; गाजराची २८५४.

**गाठ**– (स्त्री.) १) **गाठ**; गाठी १४४, ४५७, १२६५; गाठी बांधणे – **संचय करणे** ३८, ६९६;
(वा.प्र.) **गाठी असणे** – पदरी असणे ६१९; **गाठ उकलणे** – मुक्त होणे १३३६; **गाठ सुटणे** – भांडवल कमी होणे १९२३; **गाठ उकलणे** – गैरसमज दूर होणे २५१०; **गाठी सोडणे** – प्रपंच सोडणे ३१७०;
२) **पर्यंत जाणे**; गाठी १५०;
३) **भेट**; गाठी ३०९, १२७४;
४) **कपाळावरील आठ्या**; गाठी १६१९.

**गाठा**– (पु.) **गाठ** ४६६;
२) **खंडोबाभक्तांच्या गळ्यातील रुप्याचे कडे**; गाठ ७९७.

**गाठोडी-ळी**– (स्त्री.) **गाठोडे**; गाठोडी १५६२; गाठोडीस १६४१; गाठोळीस १४४८; गाठोळीची २२५४; गाठोळे २३२५.

**गाडगे**– (न.) **मातीचे लहान मडके**; गाडगी ४१८; गाडग्याची १४४०.

**गाडा**– (पु.) **बैलगाडी**; गाडेवरी २०८६.

**गाढ**– (वि.) **दाट**; गाढा ४०५४.

**गाढव**– (न.) **एक प्राणी** ३६, २४५, १६२७; गाढवाचे ७७७, १२३९; गाढवाहुनी ५९९; गाढवभरी ४३९२; गाढवपशू ४०६०.

**गाढवी**– (स्त्री.) **गाढवी** २४६; ३०५०, ४४२६.

**गाढा**– (वि.) **मोठा** १०७६; गाढे १७९, १०५०, २४८२.

**गाढी**– (वि.) **घट्ट, मजबूत** १७७.

**गाढ** – (न.वि.) **मौल्यवान** १७६८.

**गाणे** (न.) **गायन** ७८, १८९, ४३३, ४४६.

**गाणे**– (क्रि.) १) **गायन करणे**; गाऊं १५८, ८६१, ११०६; गाती १७३, २८९७; गाता ३४२; गाईन ४१२, २१२०; गाऊनिया ४२०, २६२३; गाय ४३२, १३३०; गा ४३७; गाईल ६१३; गावे ८९५, १३२६; गाई ९१५; गाये १०३६, १५१४; गासी १४४१; गाइला ३४४७; गातसे ४२७३;
२) **गुणगान करणे**; गातो ५३५.

**गात्र**– (न.) **अवयव**; गात्रे ४७२, ३६४४; गात्रीं ८१८.



**गादणे**– (क्रि.) **मलीन होणे**; गादले २२६८; गादल्याचा २५३६.

**गाबाळ**– (न.) १) **गाठोडे** १५०७; गाबाळाचे १२६१;
२) केरकचरा; गाबाळाचे २९०७, ४०१५.

**गाभा**– (पु.) **सार** १५२८, ४४६८.

**गाय**– (स्त्री.) **गाय** ४५४, १२०४; गाई ८५, ५१८, १५४४; गाईसि ६८३; गाये १०३९; गाईपाठी २२१; गाईवच्छा ३३९, ३०३८; गाईगोपाळासी १७६५; गाईपशूंचे २८६४; गाईम्हैसी ३८०३; गाईम्हसी ४१९२;
(वा.प्र.) **गाई म्हसी उडणे** – गाई म्हशींनी दूध देणे बंद होणे ४५६१.

**गायत्री**– (स्त्री.) **गाय**; गायत्री २५७, ३०६५; गायत्रीचे ३८८७.

**गायन**– (न.) **संगीत**; गायनाचे ६९३; गायनाचा १०३४; गायनासी ४४५८.

**गार**– (स्त्री.) १) **बर्फाचा लहान खडा**; गारा ४५४, १४९२, ४३२४;
२) **लहान खडा**; गारा ७९९, २७८४; गारांची ८३५;
३) **गारगोटीचा लहान तुकडा**; गार १८९३, ४४८०; गारगोटी (स्त्री.) ९०१, ३०८०.

**गारुडी**– (पु.) **सापाचे खेळ दाखविणारा**; गारुडियें १०९२; गारोडी २४७५; गारोड्यांच्या २९७८.

**गाऱ्हाणे**– (न.) **तक्रार** ३९१, ३४१६; गाऱ्हाणीं ३८८; गाऱ्हाण्याने ५९१;
(वा.प्र.) **गाऱ्हाणे देणे** – तक्रार करणे ३८८.

**गाल**– (पु.) **गाल**;
(वा.प्र.) **गाल फुगवणे** – मोठेपणा सांगणे ४०५२.

**गाव**– (न.पु.) **नगर** ४२४; गावा ५१०, १२४०, ३३६८; गावींचे १२७९; गावे १७०८; गावाखालील १४८१; गावलोकी – **गावातल्या लोकांनी** ४१७७.

**गावगुंड**– (पु.) **गावातील गुंड** ४३५.

**गांवढाळ**– (वि.) **अडाणी** १७०९.

**गाहाण**– (वि.) **वस्तूच्या मोबदल्यात पैसे देणे** १०१२; गाहाणाचे २८०२.

**गाळणी**– (स्त्री.) **व्यतीत करणे** ८३, १०३६.

**गाळणे**– (क्रि.) १) **विसरणे**; गाळुनियां ७४६;
२) **सोडणे**; गाळियेले २१६१.

**गाळी**– (स्त्री.) **शिवी** २७९, ३५६; गाळियाप्रदान – **शिवीगाळ करणे** ३९२२.

**गिरिजा**– (वि.) **पार्वती**; गिरिजेप्रती १३८५.

**गिरी**– (पु.) **पर्वत** २३२, १८०३, ३१२४.

**गिऱ्हाईक**– (न.) **ग्राहक** ३२८९.

**गिऱ्हे**– (पु.) **ग्रह** ६५३.

**गिवसणे**– (क्रि.) **शोधणे, सापडणे**; गीवसीत ३७९६.

**गिळणे**– (क्रि.) **गिळून टाकणे**; गिळियेली २०५; गिळी ४४८, १०९२; गिळुनि ९९३; गिळिले १२०९; गिळियेले ४००५.

**गीत**– (न.) **गाणे** ४८१, १२३२, ३१४१; गीति १५८; गीती ४३४, ९४३.

**गीता**– (स्त्री.) **भगवद्गीता** ३४; २४५६, २९६९; गीतेमाजी ४३४३.

**गुंगणे**– (क्रि.) **डुलक्या घेणे**; गुंगायासि ४२९६.

**गुंज**– (स्त्री.) **सोन मोजण्याचे एक परिमाण** ४३७६.

**गुंडगा**– (पु.) **गुडघा** ३१७४.

**गुंडणे**– (क्रि.) **गुंडाळून ठेवणे, दूर ठेवणे**; गुंडुन १४५८, २२६८; गुंडोनी ३७५२.

**गुंडा**– (पु.) **लहान दगड** ११४९; गुंड २१३८.

**गुंडा**– (वि.) **प्रमुख** ५१७.

**गुंडाळणे**– (क्रि.) १) **आवरून ठेवणे**; गुंडाळा ४२०; गुंडाळिली ३१८८;
२) **हस्तगत करणे**; गुंडाळिले ६७२;
३) **वस्त्र गुंडाळणे, नेसणे**; गुंडाळूनि २४९१;
४) **दूर ठेवणे**; गुंडाळून ३५३८;
५) **घोटाळणे**; गुंडाळते ३६०१.

**गुंतणे**– (क्रि.) **अडकणे**; गुंतले १३२, १२३३, ४३४८; गुंतलिया १४०, ९५०; गुंतोनिया १४१; गुंतली १४४, १६३७; गुंतलासी २२७, ३३७०; गुंतलिये ३८६; गुंते ४५८; गुंतलेती १६६२; गुंतोगुंतो – **अधिकाधिक गुंतत जाणे** ४६५.

**गुंता**– (पु.) **अडकणे** ६३१.

**गुंती**– (स्त्री.) १) **मोह** ४२, ३६०९;
२) **अडचण**; गुंती १७४८;
(वा.प्र.) **गुंती उगविणे** – (जन्ममृत्यूचे) कोडे सोडविणे ८२३.

**गुंपणे, गुंफणे**– (क्रि.) **गोवणे**; गुंफोनि १३१०; गुंफले, गुंतले २१८४; गुंफू ३४२४; गुंफोनिया २११; गुंफे ४५१६.

**गुंफा**– (स्त्री.) **लहान गुहा**; गुंफेमाजी झोपडी ३३९.

**गुरवाडी**– (स्त्री.) **घाणीची जागा**; नरक ७९०; गुरवाडीची ११२७.

**गुज**– (न.) **गुपित** ३१, ६७२, २२४८; गूज १९५०.

**गुजरणे**– (क्रि.) **सांगणे, जाहीर करणे**; गुजरली २८४५.

**गुजरी**– (स्त्री.) गवळण २८७३, ४३१७.
**गुडघा**– (पु.) गुडघा २२०२; गुडघे ३७१६;
(वा.प्र.) **गुडघे फोडणे** – दुखापत करून घेणे ४४८.
**गुढार**– (न.) रहस्य ५४१; गुढारसें ३९५१.
**गुढी**– (स्त्री.) पताका, ध्वज ३५९५; गुढिया १९२, २८३९.
**गुण**– (पु.) १) सद्गुण ५३, २७२, ७५६; गुणभरिता ३८६; गुणांचीच १३७७; गुणाचा १३९१; गुणागुणे १४७२; गुणांसवे २५३७;
२) प्रेमभक्ती; गुण ३२८;
३) योग्यता, गुणवत्ता; गुण ३३७, ८०९;
४) रहस्य; गुण ४४९;
५) कारण; गुणे ५२५, ९७२, ३६६४;
६) कृपा; गुणे ६३०;
७) परिणाम; गुण ६५०, १३४१, १६४१; गुणे १५६२;
८) सगुणरूप; गुणासी ९७५;
९) अवगुण, दुर्गुण; गुण १२७२, २१४२;
१०) रीत – वागणूक; गुण १३६०; गुणे १३७१;
११) उपाय; गुण ३५२८; गुणातीत (वि.) ३७९, ५०७; गुणमोल – (न.) **गुणांचे मोल** ५६०; गुणातीता (वि.) ४४२३; गुणदोष (पु.) ७६४, १४३८, १९११; गुणदोषाच्या (पु.) ४२५; गुणदोषांवरि (पु.) १३०२; गुणनिधिनाम – (वि.) **गुणनिधी हे नाव असलेला** ६१६; गुणगंभीरा (पु.) ६६४, १११०; गुणनिधाना (पु.) ६७३, ४४२३; गुणनिधी (वि.) ९४३, ४४२३; गुणभाग – (पु.) **गुणानुसार मान्यता** १०९३; गुणवाद – (पु.) **गुणगान** १३८६, २१११, ३३६९; गुणत्रयावेगळे – (वि.) **गुणत्रयातीत** २२५८; गुण–अवगुण – (पु.)२३७८ **गुणदोष** ३३७८; गुणवादी – (पु.) **गुणांचे वर्णन करणारा** २५७५; गुणलावण्याची – (न.) **गुणांचे सौंदर्य** ३३७१.
**गुणवंत**– (वि.) **सगुणरूपधारी** ११५, १२४२, ३९८४; गुणवंता ६३५.
**गुणवंती**– (वि.) **गुणवान असलेली स्त्री** ३०५१.
**गुदरणे**– (क्रि.) भरणे; गुदरली ४३५६. गुद (न.) आतील भाग ३२१२.
**गुदद्वार**– (न.) गुदद्वार; गुदद्वारा २७५.
**गुप्त**– (वि.) १) अज्ञात १०;
२) अदृश्य; गुप्त १६०६.
**गुप्तरूप**– (वि.) **निराकार**; गुप्तरुपा ६७३.
**गुमान**– (वि.) १) गुमता ३८०, ११२९;
२) पर्वा, फिकीर; गुमान ८५९, २२९३.
**गुरु**– (पु.) **उपदेशक, मार्गदर्शक** २९१, ८७३, २११३; गुरुचे ४५२, १२०८; गुरुच्या ४६५; गुरुने २२९०; गुरुचिया ४४०७; गुरुहत्या (स्त्री.) २५३; गुरुराजा (पु.) ३६९; गुरुचरणी (न.) ४५०; गुरुदास्य (न.) ६४८, १२११; गुरुपुत्रा (पु.) १४६९; गुरुकृपेचा (स्त्री.) १७९०; गुरुभक्ति (स्त्री.) १८८६, २२६१; गुरुकृपा (स्त्री.) २६६८, २८४६; गुरुशिष्यपण (न.) २७९७; गुरुज्ञान – (न.) **गुरुने सांगितलेले ज्ञान** २८६९; गुरुमार्गामुळे – (पु.) **गुरुच्या आचारामुळे** २९७३; गुरुपादाग्रीचे – (न.) **गुरुच्या पायाच्या बोटांचे** ३१०५; गुरुतीर्थी (न.) ३१०५; गुरुअंगुष्टा (न.) ३१०५; गुरुमूर्ति (स्त्री.) ४३५७; गुरुगम्यखुणे – (स्त्री.) **गुरुच्या मुखातून मिळणारे ज्ञान** ४३८८; गुरुपूजा ४४६७.
**गुरुगुडी**– (स्त्री.) **गुडगुडी, धूम्रपानाचे एक साधन** १२१४; गुरुगुडीचे ३०६७.
**गुरगुरणे**– (क्रि.) **ओरडणे**; गुरगुरी १३८८,३९३.
**गुरगुरु**– (स्त्री.) **कुत्र्याचे भुंकणे** १५३६.
**गुरुवार**– (पु.) **सात वारांपैकी एक** ३६८.
**गुरे**– (न.) **जनावरे** २२९, १३३५; गुरेवासरे ६०.
**गुलाम**– (पु.) **सेवक.**
**गुसळणे**– (क्रि.) **घुसळणे**; गुसळा ३८८; गुसळिले ६५०; गुसळिला ३०८९.
**गुहा**– (स्त्री.) **डोंगरातील वा जमिनीतील विवर** १४८६.
**गुह्य**– (वि.) **रहस्य, शब्दातीत**; ९१९, १३८५, ३६४४.
**गू**– (पु.) **विष्ठा** २८७.
**गूढ**– (वि.) **गहन, कळण्यास कठीण** २३१४.
**गूळ**– (पु.) **गूळ** ५८१, ३८३९; गुळा ९८; गुळे ३२७०; गुळवाटी – **खाद्यपदार्थ** ३९४.
**गृह**– (न.) **घर** ५९, ५७५; गृहीं ३०८०; गृहदारा-आसघनवित् – **घरदार, पैसा यांची इच्छा** १०७३.
**गे**– (संबो.) १५७.
**गेठा**– (पु.) **गळ्यातील मण्यांचा एक अलंकार** २३५५.
**गेले**– (वि.) **मागचे, मागील** ३६.
**गोंडा**– (पु.) **वेणीत घालायचा अलंकार**; गोंडे ३९४.
**गोंधळ**– (पु.) १) **गाजावाजा, गडबड**; ७३, २०९, ७९१;
२) **जंजाळ**; गोंधळी ७९१.



३) **वर्णसंकर**; गोंधळ ९०४.
**गोंधळ**– (पु.) **एक कुळाचार**;
(वा.प्र.) **गोंधळ मांडणे** – **देवीचा गोंधळ घालणे** ४४६.
**गो**– (स्त्री.) **गाय** १२३; गोधन (न.) २०९, २२०; गोधनां (न.) ६४२; गोधने (न.) १५७६, ४३८५; गोब्राह्मणहिता (न.) ४५०३.
**गोकुळ**– (वि.ना.) **कृष्णाचं बालपण जिथे गेले तो गाव** १८०३; गोकुळी १७२, ३६४०; गोकुळासी २८३६.
**गोकुळनायक**– (वि.) **कृष्ण** ४०५.
**गोकुळवासी**– (वि.) **गोकुळात राहणारे** ४४२३.
**गोचिड**– (पु.) **एक कीटक** २०४१; गोचिडासी ४५०५.
**गोजिरा**– (वि.) **सुंदर, नाजुक** १५७१; गोजिरी ४४५, १६९८, ३२९८; गोजिरे ५३२, २२४२; गोजिरिया ८२८, ३९८१.
**गोटा**– (पु.) **लहान गोलसर दगड**; गोटे २९४४, ४०९२.
**गोठण**– (न.) **गुरांचे वनातील विश्रांती स्थान** १८६.
**गोठले**– (न.) **शरीररूपी गाठोळे** १४१५.
**गोठी**– (स्त्री.) **गोष्ट** १०८४, ३३८४; गोटी १३७०.
**गोड**– (वि.) १) **आनंददायक** ३, २९०, ३८८, १२३८;
२) **मधुर**; गोड ४१, २५५, १३८६; गोडे ६१४; गोडा १६७८; गोडावरी २५५; गोडपणे – (न.) **गोडवा** २५५; गोडधड (वि.) १२३३;
(वा.प्र.) **गोडचित्ती लागणे** – **मनाला सुखावह होणे** ४६९; गोडा (वि.) **आवड, गोडवा** २४, ३६७७.
**गोडावणे**– (क्रि.) १) **गोड होणे**; गोडावली ६९९, ३२९३; गोडावले ९४३; गोडावला ४५३३;
२) **चटक लागणे**; गोडावला ४५३३.
**गोडी**– (स्त्री.) **गोडवा**; १८, ९२०, १३८३; गोडीरस – (पु.) **ब्रह्मरसाची गोडी** २३१४.
(वा.प्र.) **गोडी धरणे** – **गोडी लागणे** ३७६; **गोडी लागणे** – **आवड निर्माण होणे** १४९६.
**गोडे**– (वि.) **गोंडस** २३८७.
**गोणी**– (स्त्री.) **धान्याचे पोते** ५६८, १४८२; गोण्या ३०७०.
**गोत**– (न.) **आप्तइष्ट** ४२४; गोते ३६५, २६२८; गोताचीच ६१४; गोतां ६२९, ६८३.
**गोता**– (पु.) **नुकसान**
(वा.प्र.) **गोता खाणे** – **नुकसान सोसणे** २३१३.
**गोत्र**– (न.) **विशिष्ट ऋषीच्या कुळातील**; गोत्रबहिणी – **गोत्रातील बहिणी** ३९९३.
**गोदा**– (वि.ना.) **गोदावरी नदी**; गोदातटे १०४९; गोदातीरी २४७६; गोदेकाठी २५४३.
**गोप**– (पु.) **गवळी** ३७९.
**गोपांगना**– (स्त्री.) **गोपस्त्रिया** १८०३.
**गोपाळ**– (वि.ना.) १) **कृष्ण** १४६, ३४६७; गोपाळा ३९४, ५०३, १२७२; गोपाळालागी ४०९; गोपाळ-गोपिकारमणा (पु.) ६३५;
२) **कृष्णाचे सवंगडी**; गोपाळ १४४, ३९६; गोपाळे १४९, १४८८; गोपाळांची १७४, १०३९; गोपाळांचा २१००; गोपाळावरी ३२०५.
**गोपाळकाला**– (पु.) **गोपाळांनी एकत्रित केलेले खाद्य पदार्थ** २१३.
**गोपाळपुर**– (न.) **पंढरपूरनजिकचे क्षेत्र, यात्रेनंतर इथे काला होतो** ४२०५.
**गोपिका**– (स्त्री.) **गवळणी** २२०, ३९६, १११२, २८०३; गोपिकांची १०३९, १६१६; गोपिकांच्या १२६८, १९१५; गोपिकारमणा (पु.) ६७३, ४४२३.
**गोपी**– (स्त्री.) **गवळणी** १०३, २१००; गोपींचे १७६५; गोपीगोपाळा ६४२; गोपीवाळा १७६; गोपीमनोहर ४४१५.
**गोपीचंदन**– (न.) **पांढरे गंध** १४९३; गोपीचंदन उटी (स्त्री.) १८९.
**गोपीनाथ**– (वि.ना.) **कृष्ण**; १४८, ३९१३, ४५३९; गोपीनाथे ३७९.
**गोप्य**– (वि.) **गुप्त** १७१६, २६३२.
**गोफण**– (स्त्री.) **शेतातील पाखरे उडवून लावण्याचे साधन**; गोफणेसी ११४९.
**गोमटाटे**– (वि.) **सुंदर, चांगले**; गोमटा १९८१, ३७१२; गोमट्याचा २४०७; गोमटी ६२, १६३५, १९०५; गोमटे २६५,, ७२७; गोमटियांसाठी २२४०, ३६२१.
**गोमती**– (वि.ना.) **एक पवित्र नदी** ४५४.
**गोमाशी**– (स्त्री.) **एक कीटक**; गोमाशा ३७३९.
**गोमास**– (न.) **गायीचे मांस**; गोमाससमान १८९३.
**गोर**– (वि.) **गोड** २२६.
**गोरखा**– (पु.) **गुरे राखणारा**; गोरठे १८०.
**गोरस**– (तो.) **गायीचे दूध** ३८९; गोरसे ४००२.
**गोरा**– (वि.) **गौरवर्णाचा**; गोरा ३८९; गोरे २३५; गोरी ३९०.

**गोराकुंभार–** (वि.ना.) **एक संत** २८२०, ४२९९.

**गोरांजन–** (न.) **ईश्वर प्राप्तीसाठी करायचे आत्मदहन**; गोरांजने ३६७.

**गोरेपण–** (न.) **गोरा वर्ण** ४३७७.

**गोऱ्हवाडी–** (स्त्री.) **हगीनदारी** २२०३; गोऱ्हवाडीचा २२१०.

**गोवणे–** (क्रि.) १) **गुंतविणे, अडकविणे**; गोवियेले १३२, २२४४, ४२१९; गोविला २०१, १०३९; गोवूनी ३९३; गोवूं ५४६; गोऊ ८९४, ९६८; गोविसी १२२६; गोवी १८९८;
२) **बरबटणे**; गोऊनि १८०;
३) **भरणे**; गोविली १७६९;
(वा.प्र.) **गोवी पावणे** – बंधनात अडकणे १३९५.

**गोवरी–** (स्त्री.) **शेणी** ९९; गोवऱ्या ३८३६.

**गोवर्धन–** (वि.ना.) **एक पर्वत** १८०३; गोवर्द्धन ४५६६.

**गोवळ-ळा–** (पु.) १) **गवळी, गोपाळ**; गोवळ १९७, २३०१; गोवळे ३१४३; गोवळा १९; गोवळी १८२; गोविळायासवे १४५४;
२) **कृष्ण**; गोवळिया १४५१; गोवळे ३१६२; गोवळ्यासवे १९.

**गोवळे–** (न.) **वस्त्राचा गोळा** ३४४९.

**गोवा–** (पु.) १) **अडथळा, गुंता** ३६५, ८८५, १११७; गोवे ८०, १०९, १००४; गोवी ४५७;
२) **साकडे, संकट**; गोवा ६२४;
३) **बंधन**; गोवा १२४८;
४) **टप्पा, पायरी**; गोवे १२९०;
(वा.प्र.) **गोवा उगविणे** – गुंता सोडविणे १२५७, १२८१.

**गोवार–** (न.) १) **समुदाय**; गोवारे ८८७;
२) **शेणाने सारविणे**; गोवार– (पु.) ४२९६.

**गोवारी–** (पु.) **गवळी** १९०, ३७१९.

**गोविंद–** (वि.ना.) **कृष्ण** २१, ७७६, १४९८; गोविंदाचे ९; गोविंदाच्या ३८; गोविंदी ७९, १४५०; गोविंदे ४१२, ६७८; गोविंदासवे ३७५; गोविंदावाचोनि २२०२.

**गोविंदनाम–** (वि.ना.) **कृष्ण** २२९८.

**गोवी–** (स्त्री.) १) **गुंतवणूक** १४९, १४८६, २०७२;
२) **अवघड**; गोवी ३८०.

**गोष्ट–** (स्त्री.) १) **कथा**; गोष्टी १५२, ३३६, ८१७, १३३०;
२) **संभाषण**; गोष्टी १४६९.

**गोसमाळी–** (स्त्री.) **कानउघाडणी** ३९७८.

**गोसावी–** (पु.) १) **स्वामी, गुरु**; २९९, १४३६, २८५६;
२) **मनोनिग्रही**; गोसावी ७२१;
३) **बैरागी**; गोसावी २८९२;.
४) **ईश्वर**; गोसावीच ३२१४.

**गोह, गोहो–** (पु.) **नवरा, पती**; गोहा ३६; गोहाची ४४७७; गोहो ५६, १६२०, ३०८०.

**गोहत्या–** (स्त्री.) **गायीची हत्या** ३९९७.

**गोही** – **ग्वाही, साक्ष**; २१४५, २३३५, ३५७३.

**गोळा–** (पु.) १) **मोठा घास**; १४८, २२४;
२) **एकत्रित**; गोळा ६५०, १२८४;
३) **लोखंडाचा गोळा**; गोळा ३८२७.

**गोळी–** (स्त्री.) **बंदुकीची गोळी** २०३९; गोळ्या १०६३, १६१४.

**गौरव–** (पु.) १) **सन्मान** ३४८, १४६१, ३४१०; गौरवांपुरते ५८६;
२) **आनंद**; गौरव २४१०;
३) **अवडंबर**; गौरव २८४३.

**गौरविणे–** (क्रि.) १) **सन्मान करणे**; गौरविली २६९, १०१७; गौरवी ३७७, ६६३; गौरविता १३४३; गौरवीन १५६८; गौरवीत २८३४;
२) **सजविणे**; गौरविले ४३७७.

**गौरीबाळ–** (वि.) **गणपती** ६१०.

**गौरीहर–** (वि.ना.) **शंकर-पार्वती** २७८५.

**गौळण–** (स्त्री.) **गवळ्याची बायको**; गौळणी १६६, २२१, १२०८.

**गौळी–** (पु.) **गवळी**; गौळीयाची १००; गौळियांचे ७०६, २८२०; गवळ्याघरी (न.) ५०७.

**ग्यानगड–** (पु.) **अहंकार** २७३९; ग्यानगडे ३६७८.

**ग्रंथ–** (पु.) **धर्मग्रंथ**; ११८, २३२९; ग्रंथी १३४६; ग्रंथांचे २०१३; ग्रंथाचिये २३२४. 4299,

**ग्रंथपुराण–** (पु.) **पुराणग्रंथ** ६०९.

**ग्राम–** (न.) **गाव** ३७४२; ग्रामवासी(पु.) ७४.

**ग्रामपशू** – (पु.) **कुत्रा** १२६२.

**ग्रास–** (पु.) **घास**; ४६८, १६३०, ४५५०; ग्रासा ४९८; ग्रासोग्रासी – **प्रत्येक घासाला** ७११, ३५५४, ४३३१.

**ग्रासणे–** (क्रि.) **गिळून टाकणे**; ग्रासिले २२५५; ग्रासावया २८०८; ग्रासूनि ३४८९; ग्रासियेले ४२३९.

**ग्राहिक–** (पु.) **गिऱ्हाईक** ४०५२.

**ग्लानी–** (स्त्री.) **मूर्च्छा** ३३९.



**ग्वाही–** (पु.) १) **हमी, खात्री** १४४, १३३३, १४०७;
२) **साक्ष**; ग्वाही २९३, ९२४, ३३९८.

## घ

**घंटा–** (स्त्री.) **घंटा** २५५०, ३९३९.

**घट–** (पु.) १) **मातीचा घट, डेरा**; ३७९, ११४६, ३५५८; घटाच्या ८८३; घंटी १५२६;
२) **देह**; घटीं ९९३.

**घटाघटा–** ध्वन्यनुकारी शब्द ४२९६.

**घटपट–** (स्त्री.) निरर्थक चर्चा ३४८०.

**घटापटा–** (क्रि.वि.) **निरर्थक चर्चा**; २७२, १३८६, ३२४२.

**घटस्फोट–** (पु.) **संबंध तुटणे**; घटस्फोटापाशी २६७०.

**घटिका–** (स्त्री.) १) **कालाचे परिमाण**; ४६९, १६४१;
२) **मरणवेळ**; घटिका १६०२;
३) **अल्पकाळ**; घटिका ३४६०; घटिकापळ (पु.) ११४७.

**घडघडाट–** (पु.) **घोष** १५४३, ३४९६.

**घडघडणे–** (क्रि.) **आवाज होणे**; घडघडे २३७८.

**घडणे–** (क्रि.) १) **लाभणे**; घडावा ४६; घडे ४८, १०८, १२९९; घडेल ३७४; घडो १३७१; घडावी १३७९;
२) **होणे**; घडली ८९; घडतील २७७; घडती ११४३; घडे १४३२;
३) **मनाविरुद्ध घडणे**; घडिले २६९;
४) **लागणे**; घडती १४३०;
५) **(दागिने) घडणे**; घडो २८२०; घडिली ३६१२.

**घडी–** (स्त्री.) १) **अल्पकाळ** ८, १२७, ३७६, ९४१, १३५९; घडीघडी – **वारंवार** १९७, १२५३; घडोघडी – **प्रत्येक क्षणी** ४३६४;
(वा.प्र.) **घडी साधणे** – नेमकी वेळ साधणे ३६४; **घडी लेखणे** – मरण निश्चित करणे २३८८;
२) **वस्त्राची घडी**; घडिया ९३; घडिचा ३४४९.

**घडी–** (स्त्री.) **पायघडी**; घडिया ४९६.

**घडीमोडी–** (स्त्री.) **घडणे, मोडणे** ४२७; घडमोड ६७४.

**घण, घन–** (पु.) **मोठा हातोडा**; घणी ५०; घणे १४९२; घणाचिया ३१८०; घन ५५१.

**घन–** (पु.) **मेघ** ५१३.

**घनघाय–** (पु.) **घणाचा घाव**; घनघाये १७५४.

**घनदाट–** (वि.) **गर्दी** १९४.

**घननीळ–** (वि.) **मेघाप्रमाणे निळा, कृष्ण** ४, ४४३३; घननीळ ११२.

**घनमेघ–** (पु.) सावळ्या रंगाचा मेघ, कृष्ण ६.

**घमंडी–** (वि.) **विपुलता** ३२६८.

**घर–** (न.) **राहण्याचे ठिकाण** ११, ५६, ३४६, १३३६; घरी ७४, २०९, १३७६; घरा ८१, ७३७; घरासि ९२; घरिचे ३९०; घरात ४३३; घरे ३०८५; घरोघरी (न.) ६०, ११२६, १७१५; घरींदारी ३८८, २३६३; घरकुल ४३३, २३३१; घरबुडी – **संसार नाश** २५६५; घरघेणा – (पु.) **घर बुडविणारा** २७१७; घरवासी (पु.) ४१९२; घराश्रम – (पु.) **घरातील काम** ४३१७; घरा येणे – **प्राप्त होणे** ८१; घर खाली करणे – **घर सोडणे** १२९; घर बुडविणे – **घराचा नाश करणे** २५९; घर घरणे – **घरात बसून राहणे** ३९२; घरदार करणे – **प्रपंच थाटणे** ४६४; घर धुणे – **घरातील वस्तू वाटून टाकणे** ५६६; घर पाठी लागणे – **बैचेन होणे** १९१३.

**घरटी–** (स्त्री.) **फेरी**; ३३२, ६४२, २३१३, ३९८६;
(वा.प्र.) **घरटी करणे** – फेऱ्या घालणे ३३२.

**घररिघी–** (वि.) **आपण होऊन घरात घुसणारी** ९.

**घरचार–** (पु.) **संसार** ४४९, ४१७७.

**घराचार–** (पु.) **लोकाचार** ३७३८.

**घराचारी–** (वि.) **घरात, सर्वत्र** १५६८.

**घवघवीत–** (वि.) **ठसठशीत** ४३३३.

**घसघस–** (स्त्री.) **कटकट** २१३२, ३४९२.

**घसणी–** (स्त्री.) **दाटी** ४२०६.

**घसा–** (पु.) **गळा, नरडे**; घसा १७५८;
(वा.प्र.) **घसा फुटणे** – घसा फाटणे ६८८.

**घाई–** (स्त्री.) १) **त्वरा, लगबग** १४२, १८०९, ४३८८;
२) **संगत**; घाई १९२;
(वा.प्र.) **घाई धरणे** – घाई करणे १४३.

**घागर–** (स्त्री.) **घडा**; घागरी ४१८, १७२८, ४३१७.

**घागरी–** (स्त्री.) **पायातील अलंकार**; घागरिया ३३८; घागऱ्या ४३२, ६१०; घागऱ्यांच्या ७४१.

**घाट–** (पु.) **डोंगरातील चढण** ४४२१.

**घाटणे–** (क्रि.) १) **एकजीव करणे, रगडणे**; घाटी २२२८; घाटावे २३७१; घाटे ३४७१; घाट २२२७, ३१९८;
२) **अनुकरण करणे**; घाटा १४४;
३) **घुसळणे**; घाटू ४१२६.

**घाटा–** (पु.) **फोलफट, टरफल**; घाटे १६२.

**घाटी–** (स्त्री.) **नरडे, गळा** ६०३.

**घाणा–** (पु.) १) **तेल काढण्याचे लाकडी यंत्र** ८८, २०१७, ४५०६;

२) फेरा; घाणा १८४२.

**घाणी**– (स्री.) दुर्गंध; २१९८, ३४९२;
२) नरक; घाणी २१९६;
३) उग्र वास; घाणी ३९०; घाणी सांगाते ३१८५.

**घाणेरी**– (वि.) कुशब्द २४०२.

**घात**– (पु.) १) अहित ५२, ७९५, १०२७; घातें २८२; घाता ९४७;
२) संगीतातील स्वराघात; घात ७८;
३) संकट, विघ्न; घातीं १४३९; घात १४६९; घातावरी – घातासाठी टपलेला १७२१.

**घातक**– (वि.) मारक, हानीकारक २८९५.

**घातकर**– (वि.) नाश करणारा ७६, ६१३.

**घातकी**– (वि.) नाश करणारा.

**घातपात**– (पु.) विध्वंस, नाश ११११, ४१२७; घातपाते २७७९.

**घाबरे**– (वि.) भित्रा २१२.

**घाम**– (पु.) घाम ४४९१.

**घामेजणे**– (क्रि.) पाझर फुटणे; घामेजेना ३४५३.

**घाय**– (पु.) घाव; घाये १०६; घायेविण २०४२; घाईडाई ५५१; घाय – (पु.) योग्यता २१९६.

**घायडाय** – (पु.) १०७२; घायडाय हात – डावपेच १३२७.

**घायकुटे** – घायाळ ३८७६.

**घायाळ**– (वि.) जखमी १४०६, ३९७९.

**घार**– (स्री.) एक पक्षी; घारी ३७३६.

**घालणी**– (वि.) १) घातक; घालणीचे १२८०;
२) घालविणे; घालणी ३४२३.

**घालणे**– (क्रि.) १) अंथरणे, पसरणे; घाली ३६; घालिसी १५५;
२) पुढे करणे; घाली १४८;
३) ठेवणे; घालूं ७५४;
४) देणे; घातले ११३१.

**घालमेल**– (स्री.) एकत्रीकरण; घालमेल ४५२८.

**घाला**– (पु.) हल्ला; ७५५, १८४१; घाले ४३२३; (वा.प्र.) घाला घालणे – हल्ला करणे ३८२१; घाला पडणे – हल्ला होणे ७६८, १२६५; घाव उमटणे – आघात होणे २०३१.

**घावडाव**– (पु.) १) प्रसंग ४५०;
२) संधी; घावडाव १८९६;
३) घाव सहन करणे; घावडाव २३०५;
४) डावपेच; घावडाव ३१९१.

**घास**– (पु.) अन्नाचा घास; १२८, ८८४, २९५८; घासें ८२०; घासोघासी – प्रत्येक घासाला २०६.

**घुगरी**– (स्री.) गव्हाचा एक पदार्थ; घुगऱ्या १४९५, ४४५१.

**घुबड**– (न.) एक पक्षी ९१३.

**घुमरी**– (वि.) विपुल ३३१, २००७, ४४२८.

**घुमारा**– (पु.) विपुल ४६६.

**घुरट**– (वि.) उग्र ३९०.

**घुरे**– (पु.) एक दुर्गंधी वृक्ष ३८२७.

**घुसमांडणे**– (क्रि.) रगडणे; घुसमांडील ३७८.

**घुसळणे**– (क्रि.) घुसळणे; घुसळिता ९१८; घुसळूनि ३५५३.

**घृत**– (न.) तूप; ४३५३; घृतसार ११४० तूप हेच सार; घृतसाकर १७५८.

**घेणे**– (क्रि.) १) चाखणे; घ्यावे ४०, ७१५, १३७७; घेऊ १०७; घेऊनियां ११५; घ्यावया १४८; घेती १८४; घ्यारे १९३; घेण्याच्या ३१४; घेसी ४३३; घेइजेसे ८८८; घेइन १३५७; घेईल १४६४;
२) म्हणणे, उच्चारणे; घे ८६;
३) गिळून टाकणे; घेतल्या ८६;
४) स्मरण; घेता १८५;
५) खाणे; घेणे १९१;
६) जिंकणे; घेवविली १०९७;
७) स्वीकारणे; घेतला १३७२.

**घे–घेमारी**– (स्री.) हाणामारी.

**घोंगडी**– (स्री.) लोकरीचे जाडे वस्त्र १०८२.

**घोंगडे**– (न.) लोकरीचे जाडेभरडे वस्त्र १०८०, १०९१; २३७१, २५६४; घोंगडियांचा १०८१; घोंगडियांची १०८३; घोंगडियास १०८७.

**घोंघाणि**– (वि.) अडाणी; घोंघाणिया २३७५.

**घोकणे**– (क्रि.) वारंवार म्हणणे; घोकिता १२१०; घोकी १३१०; घोकावे १४८४; घोकिले १६२२; घोकाया २७६६; घोकूनिया ४२१२.

**घोगे**– (वि.) मोठे ३७४६.

**घोट**– (पु.) घुटका १७७०, ४३९७.

**घोटणे**– (क्रि.) १) (पाणी) सुटणे; घोटूनिया १४८;
२) गिळणे; घोटी ५७६.

**घोटा**– (पु.) भांग घालून केलेले पेय ४२९६.

**घोडा**– (पु.) अश्व; १५२४; घोडे १३३, ७७७; घोड्याची ६८३; घोडीं २४५९, २८२०.

**घोण**– (स्री.) खिन्नावस्था; घोणे ३८८.

**घोर**– (वि.) अर्वाच्य; घोरा ३२८७.

**घोष**– (पु.) गजर १४३, १११०; २३६०, ३४१२.



**घोसुले**– (न.) घड ६६०.

**घोळ**– (पु.) १) वाघ्याच्या हातातील लोखंडी वाद्य ४६६, २११२; घोळी ८७१;
२) घुंगरांचा समूह; घोळ ६१०.

**घोळ**– (पु.) घोटाळा २५१६.

**घोळणे**– (क्रि.) १) घासणे; घोळितां १५१;
२) चिकटून बसणे; घोळिसी १५१;
३) मिसळणे; घोळिले १७३२;
४) फिरणे; घोळी २५६०.

**घ्राण**– (न.) नाक २७७९.

## च

**चंचळ**– (वि.) अस्थिर १४९, १८३७, ४३०४.

**चंडी**– (वि.ना.) चंडिका, एक देवता २३८४.

**चंदन**– (पु.) एक सुंगधी वृक्ष ३६, १२६०, २९५७; चंदनाची ४, १०५६; चंदनेही ६३; चंदनाच्या १९५; चंदना २८९; चंदनाचे २९०; १७५९; चंदने ७७५; चंदनपणे २६६५; चंदनातिल ४४७८.

**चंद्र**– (पु.) एक देवता ४५४; चंद्रासी ८१६; चंद्रघणी – मनाचे समाधान १७४; चंद्रलीळा – चंद्रकला ४७५; चंद्रकोटी – कोट्यावधी चंद्र १११२; चंद्रसूर्य १२८४; चंद्रकळा – चंद्रप्रकाश १६२१; चंद्रामृत – चांदणे २०११.

**चंद्रबळ**– (न.) पाठिंबा ३१३.

**चंद्रभागा**– (वि.) पंढरपूरच्या भीमा नदीचे एक नाव ११२६, ४३१८; चंद्रभागे १११, १६१०, २४९३; चंद्रभागेचिये १५४९; चंद्रभागेतीरी २०७९.

**चंद्रमा**– (पु.) चंद्र २८२१, ४१४३.

**चंद्रमौळी**– (वि.ना.) शिव ५९७.

**चंपे**– (पु.) एक खेळ ३०८१.

**चकोर**– (पु.) मेघातून पडणारे पाणी पिणारा पक्षी; चकोरा २८२१, ४३०८.

**चक्र**– (न.) कृष्णाचे सुदर्शन चक्र ११५, ४४५, ५४४, १५९६; चक्रफेरा (पु.) २३१३.

**चक्रचाळा**– (वि.) चक्रचालक, कृष्ण; चक्रचाळे २५६३; चक्रधरा – (वि.) चक्रधारी कृष्ण ६४६, १८७५.

**चक्रपाणी**– (वि.) चक्र हातात धरणारा, कृष्ण ३९१, १११२, १६२९.

**चक्रफेरी**– (स्री.) रहाटगाडगे ३५९३.

**चक्रवर्ती**– (वि.) सार्वभौम राजा १३३, ३७५०.

**चघळणे**– (क्रि.) पदार्थ तोंडात घोळविणे; चघळी ७७७.

**चट**– (स्री.) १) आवड ३७९, २५६३;
२) सवय; चट ३९३, १८६५, ३७१३;
(वा.प्र.) चटा लागणे – नादी लागणे ४०४.

**चटके**– (वि.) दिखाऊ; चटक्या १४१२.

**चढणे**– (क्रि.) १) वर जाणे; चढेल १४०; चढते ६९३;
२) उत्पन्न होणारे; चढे १५६५;
३) वाढणे; चढो २६३९.

**चढते**– (वि.) वाढणारे १३०४.

**चढी**– (स्री.) मात, वर्चस्व १६८.

**चणा**– (पु.) हरभऱ्याचा दाणा; चणे २४५२.

**चतुर**– (वि.) हुषार ३९५, १००१, १३९९, ३१२४; चतुरा ६३७; चतुराच्या १८२५.

**चतुराई**– (स्री.) चातुर्य, हुषारी ३३५२.

**चतुराशिरोमणी**– (वि.) चतुरांमध्ये श्रेष्ठ ९७६, ३७२०.

**चतुर्भुज**– (वि.) १) चार हात असलेला कृष्ण ३३२, १५९६, ३१७६; चतुर्भुजा ६४२, १५७७;
२) देवरूप; चर्तुर्भुज ११२६.

**चतुर्मुख** – (वि.) ब्रह्मदेव; चतुर्मुख १५७७.

**चपळ**– (वि.) १) जलद हालचाल करणारा १३९, १८३७; चपळा ४६०;
२) चंचल; चपळ १७३७.

**चपळत्व**– (भा.ना.) चपळपणा; चपळत्वे ९५८.

**चपे** – (स्री.) तडाख्यात १११५.

**चपेटा**– (पु.) तडाखा, चापट ४०७२; चपेटे १२६५; चपेट ३२९०.

**चमकणे**– (क्रि.) आश्चर्यचकित होणे ६७८.

**चमत्कार**– (पु.) अद्भुत गोष्ट २७२.

**चरचरणे**– (क्रि.) वेदना होणे; चरचरी २३८१.

**चरण**– (पु.) पाय; चरण ५, ३९१, १३२५; चरणी ४६०, ६१०, १३८२; चरणा ४९९; चरणांच्या ५३४; चरणरज – (स्री.) पायधूळ ३८, ४९५, १६६८; चरणरजे १४०८, २०५२; चरणसेवा ५०४, ७६१, २४३३; चरणसेवक ६६४; चरणांबुजे – चरणकमल ८६२; चरणकमळ १०१८, ३३६०; चरणरजधुळी २७५४.

**चरणे**– (क्रि.) गुराचे गवत खात फिरणे; चरे १५६, १५५६; चरत ६७८.

**चरणे** – (क्रि.) जखम खोलवर पसरणे; चरे १३९७.

**चरफड**– (स्री.) तडफड ११६, १६७२.

**चरफडणे**– (क्रि.) तडफडणे, संताप; चरफडे ८५०;

चरफडी १०३१, १८३७.
**चरवण**– (न.) **चघळणे, रवंथ करणे**; चरवणीं८३.
**चरवी** – (स्त्री.) **दुधाची कासंडी** ४०४३.
**चराचर**– (न.) **सर्व जग**; चराचरी २५७, ३७७, २३१७, ३९२९.
**चरित्र**– (न.) **जीवनातील घटना** ३६४०; चरित्रे ५५३; चरित्रउच्चारे १६४९.
**चर्चा**– (स्त्री.) **गप्पा** २०४३.
**चर्म**– (न.) **कातडे** १७३२, २८२०; चर्मातु – **कातडे** ४५४; चर्माचिया ३६५८; चर्मदृष्टि – (स्त्री.) **बाह्यदृष्टी** २०४५; चर्मचक्षु (न.) २८३५; चर्ममास – (न.) **कातडे आणि मांस** ३४६१.
**चर्मक**– (पु.) **चांभार**; चर्मकाचे २९८२.
**चर्या**– (स्त्री.) १) **आचरण**; चर्या ४८२;
२) **दिनचर्या**; चर्या ८३८;
३) **चेहरा**; चर्या २०६९;
४) **बांधणी, रचना**; चर्या ४५९८.
**चर्वणा**– (स्त्री.) **चर्चा**; चर्वणी १४२९.
**चलणे** – (क्रि.) **चालणे**; चला ३८, १३१३.
**चव** – (स्त्री.) १) **आवड**; चवी २३०, ३०२, २१६५;
२) **गोडी**; चवी २८८, १०९८, २६००;
३) **रीत, मर्यादा**; चवी ८४०, १८७९.
**चवगुण**– (सं.वि.) **चौपट** ४५४१.
**चवदा, चौदा**– (सं.वि.) **एक संख्या**; चवदा २६१, २४८५; चौदा १५६, १९७६.
**चहू**– (स.वि.) १) **चार**; १५६, ७३१, २४८७; चहूकडोनिया ६७८, ४२३५; चहूखुरी – **चारी पायांवर** ४२९८; चहूबाही – **चारी हातांनी** ४४१२;
२) **चार वेद**; चहू ४४९.
**चळ** – (पु.) **छंद** ३०७९.
**चळ** – (पु.) **पळणे** ४४८६.
**चळकाप**– (पु.) **थरकाप** १७३, ४२३७.
**चळचळ**– (स्त्री.) **थरकाप**; चळाचळा ४२४१.
**चळण** – (न.) १) **हालचाल**; ४२८, १४२५, १८७८; चळेना २८६२;
२) **पैसा - अडका**; चळण ४२५;
३) **विविध कर्मे**; चळणांचा १३९६;
४) **चैतन्ययुक्त**; चळण ४१३९.
**चळणे** – (क्रि.) १) **चुकणे**; चळे १५४७, २३०४;
२) **विचलित होणे**; चळो १८८७;
३) **हालणे**; चळेना २८६२.
**चक्षु** – (पु.) **डोळा** ४०८९.

**चांग** – (वि.) **चांगला** १७१, ५४६, १७७२.
**चांगला-ली-ले**– (वि.) **उत्तम, सुंदर**; चांगला १६०, ६५८; चांगली १००; चांगले १०३, ६६०, ११०८.
**चांगलेपण**– (भा.ना.) **चांगुलपण** १०३५, २३१२.
**चांगा**– (वि.) **पवित्र** १३७.
**चांगावटेश्वर**– (वि.ना.) पाहा, **वटेश्वरचांगा**.
**चांचल्य**– (भा.ना.) **अस्थिरता**; चांचल्ये ६३६.
**चांडाळ**– (पु.) १) **शूद्रजातीचा** ५५, ९४५, ४४१०; चांडाळाच्या १४६९; चांडाळाचे ३९२२;
२) **दुर्जन दुष्ट**; चांडाळ ७७, ५६५, २३५५; चांडाळा ३०१, १२०३, २२४३.
**चांदणी**– (वि.) **चांदणीसारखी**; चांदणी ३९०.
**चांभार**– (पु.) **चांभार जातीचा** १३१९.
**चाकर**– (पु.) **सेवक** २६७; चाकराचे ४३७८.
**चाकरी**– (स्त्री.) **सेवा**; १७४, १२९०, २७९९; चाकरीवांचून २२१३.
**चाकाटणे**– (क्रि.) **चकित होणे, दिपून जाणे**; चाकाटले ४१५९.
**चाखणे**– (क्रि.) **चव घेणे**; चांखू ६४; चाखोनिया ४०८; चाखोनि १०९८; १९५९; चाखे २३१३.
**चाच**– (वि.) **चंचल** २७०७.
**चाचणी**– (स्त्री.) **तपासणी** ८३९, २७०७.
**चाचपणे**– (कि.) **शोधणे**; चाचपू ४५; चाचपां २२८; चाचपती ८९२; चाचपावे १३०९; चाचपसी २३६८.
**चाचपडणे**– (क्रि.) **शोधणे**; चाचपडी १३८९; चाचपडता १४३९.
**चाट**– (वि.) **लबाड** ५५२, १४६१;; चाटा २३७५.
**चाटणे**– (क्रि.) १) **जिभेने खाणे**; चाटी २७३८; चाटिता ३८७१;
२) **निरूपयोगी असणे**; चाटावे २०९.
**चाटू**– (स्त्री.) **लाकडी पळी** २२०७.
**चाड**– (स्त्री.) १) **आवड, इच्छा**; ३९, ५३६, १३०७; चाडा ५०३, ६३३; चाडे ७२७;
२) **पर्वा**; चाड ४१, ४५५, ९४८, १४६३; चाडा ३३८९.
**चातक**– (पु.) **एक पक्षी** १८२०; २८८१.
**चातुर्य**– (वि.) **शहाणपण, चतुरपणा**; चातुर्याच्या २१८२; चातुर्यसागरा १८८७.
**चापल्य**– (न.) **फुलोरा**; चापल्ये १७७९.
**चापेकळी**– (स्त्री.) **गौरवर्णाची स्त्री** ३९०.
**चाभाड**– (न.) १) **चामड्याचे तोंड** १७१८;
२) **जबडा**; चाभाड ४२३५.



**चाम**– (न.) **चामडे, कातडे** २५८८, २८१६.
**चार**– (स.वि.) १) **एक संख्या** ११६, १९४;
२) **चार वेद**; चारी १५३, ८०९, १४३९, ३८९४;
३) **चार योनी**; चारी ४६६;
४) **काहीजण**; चारी १३२८; चारचौघे ९७२; चार लक्ष ४४४३.
**चार**– (पु.) १) **वागणूक** ६७, ७६१;
२) **छंद**; चार १०७, ३१२८; चारे ४६६.
**चारण**– (पु.) **भाट, स्तुतिपाठक** ४३८६.
**चारणे**– (क्रि.) **जनावरांना चरायला नेणे**; चारावया १४८, ४३८५; चारितो १५५; चारिता ३०५; चारित २३०१.
**चारा**– (पु.) १) **गवत** १९१; चार १४८, ६०२; चाराबोरा – **गवत** १४४;
२) **खाद्य**; चारा २०१०, २०४९;
३) **आमिष**; चारा ९४.
**चाल-चाली**– (स्त्री.) १) **चाल, पुढे जाणे** ८९१;
२) **महत्त्व**; चाल ९३०; चाली – **आक्रमण** २०९;
३) **रीत**; चाली २४२; चालीचाचि ९६६; चाली करुनि ३५९८; चाली वरुनि ३५९८.
**चालणे**– (क्रि.) १) **पुढे जाणे**; चाल १३४; चालतसे ८७१; चालता १३८१; चालो १४४६;
२) **वागणे**; चालावे १४८;
३) **रुळलेला**; चालतिया ८०;
४) **वापरणे**; चाले २३९९;
(वा.प्र.) **चालून येणे** – आपणहून येणे ५६६; **चालत येणे** – परंपरेने येणे ६३२.
**चालविणे**– (क्रि.) **काळजी घेणे**; चालवील २०४.
**चाली**– (स्त्री.) १) **प्रसार** ६९६;
२) **स्पर्श**; चाली १०९७;
३) **जागा, स्थान**; चाली १५३४;
४) **अन्यमार्ग, विचार**; चाली १७०१;
(वा.प्र.) **चाली होणे** – प्रसार होणे ६९६; **चाली नाही** – खणायला वाव नसणे.
**चावट**– (वि.) **बाष्कळ** २८९६; चावटा ४०७३.
**चावटी**– (स्त्री.) **बाष्कळपणा** १३१०, ३८७१; चावटीचे ८२;
(वा.प्र.) **चावटी पिटणे** – बाष्कळ बडबड करणे ४५२२.
**चावणे**– (क्रि.) **चावणे**; चावितो १५७०.
**चावळणे**– (क्रि.) **विचलित होणे**; चावळे ६९, १४०९; चावळली १८८७.

**चाहाटळ** – (वि.) चावट १२३९.
**चाहाड**– (वि.) **चुगलखोर, चहाडी करणारा** ७७, १०८४; चाहाडाची १९७९.
**चाहाडी**– (स्त्री.) **चुगली** १२६२, ३५३२.
**चाहूर**– (स्त्री.) **एकशेवीस बिघे जमीन**; चाहुरांची २७२.
**चाहूल**– (स्त्री.) **कोणीही जवळ येत असल्याची न कळत मिळालेली सूचना**; चाहुलीने २२८.
**चाळक**– (वि.) **प्रेरणा देणारा** २०१४, ३६५८.
**चाळवण**– (स्त्री.) **फसवणूक** ३४७१.
**चाळणी**– (स्त्री.) **फसवणूक** १२६९, ३५९६.
**चाळवा**– (वि.) **फसविणारा** १८७४.
**चाळविणे**– (क्रि.) १) **फसवणूक करणे**; चाळविले ९८, ४४८; चाळविसी १४८; चाळवूं ३१७, १८०७; चाळवूनि ३९१, १२५३; चाळवावे ९७७; चाळवी १३१२; चाळवाचाळवी फसवाफसवी; २६३५, ३७८५;
२) **नादी लावणे**; चाळविल्या ३८८, २२७२.
**चाळा**– (पु.) १) **ध्यास, छंद** १०३, ५६९, २९६३;
२) **खोड**; चाळा ३९०; चाळे १०५०;
३) **विचित्र वागणूक**; चाळा ४५६;
४) **क्रिया**; चाळे ४५८, २१७२;
(वा.प्र.) **चाळा लावणे** – छंद लावणे ३९७, ६११.
**चिंतणे**– (क्रि.) **चिंतन करणे, स्मरण करणे**; चिंतिती ६७; चिंतिलाचि ६१२; चिंतीत ६३६; चिंतवेना ७४०; चिंतिलिया ७८४; चिंतिले ८६९; चिंती १३६८; चिंतू १३८३, ३६२२; चिंतोनिया २२१२.
**चिंतन**– (न.) **मनन, ध्यास** ३४, ३२४, ९९९, १३०६; चिंतने ९५४, ९८६, १२७६; चिंतनी ११०४; चिंतना १३३०; चिंतनाचा १३७६, १४२५;
**चिंतवनी** – (स्त्री.) १२७८.
**चिंता**– (स्त्री.) **काळजी**; ९, ४२४, १२५९; चिंते १०३१; चिंताडोही (पु.) ९७४; चिंतातुर (वि.) २०८२, ३१००; चिंताआसविरहित (वि.) २२८८;
(वा.प्र.) **चिंता वाहणे** – काळजी करणे २१९, ९७३; **चिंता वारणे** – चिंता नाहीशी होणे ८४९.
**चिंतामणी**– (पु.) **इच्छित वस्तू देणारा काल्पनिक मणी** ५३, ९१०; चिंतामणीपाशी ८८०; चिंतामणीसमान २९४४.
**चिंतामणी देव**– (वि.ना.) **मोरया गोसावी यांच्या परंपरेतील संत**; चिंतामणीदेवा २८८३.
**चिंधी**– (स्त्री.) **कापडाचा तुकडा** २४४, २३७६;

